


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**




# नवभारत

सप्टेंबर २००६

शिवाजी महाराज
विवेकानंद
रानडे
गोखले
टिळक
फुले
शाहूमहाराज
गांधीजी
आंबेडकर
जयप्रकाश
लोहिया
विनोबा
सावरकर
शिंदे
हेडगेवार
डांगे
भगतसिंग

## ‘उत्तर-नव’ भारत

### विकासाची विविध प्रतिमाने

## लोकशाही समाजवाद

ही यादी अपुरी आहे हे स्पष्ट आहे. या यादीत पहिल्या नावाखेरीज कोणताही अनुक्रम अभिप्रेत नाही.

यांचे आपापसात मतभेद होते आणि आपलेही त्यापैकी जवळजवळ प्रत्येकाशी असतील. अर्जुन भीष्म-द्रोणाशी प्राणपणाने लढत असे, परंतु पहिले दोन बाण प्रणिपात म्हणून त्यांच्या पायाशी टाकत असे. हे अवधान मात्र हवे.








अनुक्रमणिका



## असा युवक
## कसोटी - निर्मिकाची

"नितळ असावी सतेज कांती
नयन असावे प्रेमळ निर्मळ
अशी वहावी जीवनधारा
सोज्वळ, शीतल जणु गंगाजळ : १

बालांसह हा बाल असावा
युव-युवतींचा प्रेरक साथी
न्यायाला आधार असावा
अन्यायाला याची भीती : २

संगीताने मन रिझवावे
सजग असावी क्रीडावृत्ती
विनोद फुलुनी सहज फुटावे
खट्याळ अवखळ सालस वृत्ती : ३

आव्हानांच्या अग्निपथावर
निर्धाराने पाय फिरावे
मऊ मखमाली पायघड्यांशी
थबकुनि मागे शांत फिरावे : ४

गौर वर्ण, शेलाटी काठी
अस्थि-अस्थि आलेख दिसावा
दधीचि अस्थीसम तेथे परि
वज्राचा निर्धार असावा : ५ "

झाला ऐकुनि सचिंत 'निर्मिक'
म्हणे 'मला हे जमेल का पण?'
त्याला नकळत अवचित घडले
'एसेम'- तन मन पावन जीवन : ६

- देवदत्त दाभोलकर

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५९ । अंक १२ । सप्टेंबर २००६
श्रावण शके १९२८
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे




**संपादक मंडळ :**
वसंत पळशीकर, सुधीर रसाळ,
सीताराम रायकर, यशवंत कळमकर
यशवंत सुमंत, श्री. मा. भावे

**अतिथी संपादक :**
देवदत्त दाभोलकर

**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



## लेखक परिचय :

प्रा० ग० प्र० प्रधान व श्री० बगाराम तुळपुळे हे लोकशाही समाजवादाचे ज्येष्ठ आणि श्रेष्ठ कार्यकर्ते व विचारवंत म्हणून सुपरिचित आहेत. श्री० सुभाष वारे राष्ट्र सेवा दलाचे राष्ट्रीय संघटक आहेत. प्रा० विद्युत भागवत स्त्री-प्रश्न अभ्यास क्षेत्रात विद्यापीठ स्तरावर कार्यरत आहेत.

यापैकी कोणाशीही त्यांच्या लेखाच्या संदर्भात संपर्क साधावयाचा असल्यास अतिथी संपादक प्रा० देवदत्त दाभोलकर यांना फोन करावा किंवा लिहावे. Feedback चा मागोवा घेण्यासाठी त्यांना ते उपयोगी होईल.

संपर्कासाठी त्यांचा पत्ता -

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८ (दुपारी ३.०० ते ५.००)
E-mail : ndabholkar@rediffmail.com

(पृष्ठ क्र. ३ वरील छायाचित्र श्री. दिलीप भोजने यांच्या सौजन्याने.)

# अतिथी संपादकीय

देवदत्त दाभोलकर

या अंकाची काही वैशिष्ट्ये आहेत.

सर्व सांगत नाही. कारण काही मला अडचणीत आणणारी आहेत.

१. या अंकाबरोबर 'नवभारत' ची एकूणसाठ वर्षे पूर्ण होऊन नवभारत साठाव्या वर्षात पदार्पण करीत आहे.

२. या अंकाच्या प्रसिद्धीबरोबरच या आधीच्या कालखंडातील सर्व अप्रसिद्ध अंकांचा अनुशेष सप्टेंबर अखेर भरुन काढण्यात येत आहे. पुढील वर्ष हे 'नवभारत'चे हीरक वर्ष आहे. या हीरक वर्षात अंक नियमितपणे प्रसिद्ध होत जातील असा विश्वास वाटतो.

३. पंधरा वर्षांपूर्वी डिसेंबर १९९० च्या अंकासोबत एक निवेदन पाठविण्यात आले होते. यथोचित बदल करुन ते आजही करता येण्यासारखे आहे. ते असे होते :

*'नवभारता'चा डिसेंबर १९९० चा अंक इतक्या उशिरा प्रसिद्ध होत आहे ह्याबद्दल मनःपूर्वक दिलगिरी व्यक्त करुन 'नवभारता'चे वर्गणीदार, ग्राहक, वाचक आणि हितचिंतक यांची आम्ही क्षमा मागतो.*

*'नवभारता'ची सध्याची अत्यंत बिकट आर्थिक परिस्थिती हे ह्या विलंबाचे कारण आहे.*

*'मुक्त वैचारिक व्यासपीठ' ह्या 'नवभारता'च्या स्वरुपाला धक्का लागणार नाही अशा रीतीने ह्या आर्थिक संकटाचे निवारण करण्याच्या उद्दिष्टाने एक योजना बनविण्यात आली आहे. तिला लवकरच 'नवभारता'त आणि अन्यत्र प्रसिद्धी देण्यात येईल. 'नवभारता'च्या वाचकांकडून आणि हितचिंतकांकडून ह्या योजनेला अपेक्षित प्रतिसाद मिळेल आणि आजच्या कठीण आर्थिक परिस्थितीतून 'नवभारता'ला तरुन जाता येईल असा आम्हाला विश्वास आहे.*

*दरम्यान, जानेवारी ते ऑक्टोबर १९९१ ह्या महिन्यांचे अंक पुढील ५ महिन्यांत क्रमाने प्रसिद्ध होत जातील आणि नोव्हेंबर १९९१ चा अंक त्याच महिन्यात प्रसिद्ध होईल असे आश्वासन आम्ही देतो. ह्यात होणारा कालविपर्यास क्षम्य ठरेल अशी आशा आहे.*

४. वैचारिक नियतकालिकांच्या दृष्टीने वर्गणीदारांची संख्या महत्त्वाची असते आणि नसतेही. कोणत्याही बिकट आर्थिक परिस्थितीत वर्गणीदारांपैकी किती जण नियतकालिक याच गुणवत्तेने चालू राहिले पाहिजे, आर्थिक तूट आलीच तर ती वार्षिक तूट भरुन काढण्यात आम्ही आनंदाने सहभागी होऊ असे म्हणतात हा खरा कसोटीचा प्रश्न आहे. इतर प्रयत्नांबरोबरच याही पद्धतीचा प्रयत्न-प्रयोग हीरक वर्षात करुन पाहण्याचा *'नवभारत'* चा मानस आहे.

✠ ✠ ✠









अनुक्रमणिका

# चर्चासत्रांविषयी

## 'उत्तर-नव' भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

✠ ✠ ✠

संयोजक : नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही साभार स्वीकार करण्यात येईल.)

१. दि० २०,२१ ऑगस्टचे चर्चासत्र नियोजित तारखांना सातारा येथे संपन्न झाले. ज्यांना त्याचे इतिवृत्त हवे असेल त्यांनी प्रा० देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.

२. गांधीजी - विनोबा विचारधारा या दि० २८, २९ सप्टेंबर आयोजित चर्चासत्राला सर्वोदयाचे ज्येष्ठतम नेते प्रा० ठाकुरदास बंग हे पूर्णवेळ उपस्थित राहणार आहेत. त्यांना कोणास काही विशेष प्रश्न विचारावयाचे असल्यास आपल्या टिपणाच्या दोन प्रती पाठवाव्यात. एक प्रत ठाकुरदासजींच्या कडे आधी पाठविली जाईल.

३. १ व २ ऑक्टोबरचे चर्चासत्र प्रतिवर्षी होते त्याप्रमाणे होईल. प्रतिवर्षी विषयही समान असतो. तो असा :
**'आपण (प्रथमपुरुषी एकवचनी) आणि नवभारताची जडणघडण.'**
अशा पद्धतीने चिंतन कार्य करणाऱ्या सर्वांचे स्वागत असते. चर्चासत्र १ ऑक्टोबरला दुपारी ३.०० ते ८.०० व २ ऑक्टोबरला सकाळी ८.०० ते दुपारी १.०० असे असते.

४. २८ डिसेंबरचे चर्चासत्र ठरल्याप्रमाणे वाई येथे होईल.

५. विविध प्रतिमानांच्या मांडणीत व शोधात नवभारतला रस आहे. त्या संदर्भात आपले लेख, टिपणे, सूचना अवश्य पाठवाव्यात. लेखांविषयीचा निर्णय पंधरा दिवसात कळवण्यात येईल. लेखासोबत पुरेसे पोस्टेज असल्यास व प्रसिद्ध होण्याची शक्यता नसल्यास लेख परत पाठविला जाईल.
या सर्व विचारांचे सम्यक समीक्षण करण्यासाठीचे चर्चासत्र २७, २८ व २९ मे २००७ रोजी वाई येथे होईल.

- देवदत्त दाभोलकर








# समाजवादाचा आशय

## देवदत्त दाभोलकर

'आपल्याला अनेक अंतर्गत गंभीर प्रश्नांचा मुकाबला करावयाचा आहे. परंतु त्या अंतर्गत प्रश्नांचे केवळ विवेचन करावयाचे म्हटले, तरी आपल्या विचारांची कक्षा कितीतरी विस्तृत करणे अटळ आहे. आपले दर्शन जर स्वच्छ नसेल, किंवा निदान आपल्यासमोर कोणते प्रश्न उभे आहेत यांविषयी जर आपल्या मनात स्पष्टता नसेल, तर जगात आज माजलेल्या गोंधळापासून आपली सुटका होऊ शकणार नाही. ही वैचारिक स्पष्टता माझ्याकडे आहे किंवा महत्त्वाच्या प्रश्नांची काही उत्तरे मला गवसली आहेत, असा माझा दावा नाही. मी नम्रतापूर्वक एवढेच म्हणू शकतो की, या प्रश्नांविषयी माझे सतत चिंतन चालू असते. आपल्या कल्पना सुनिश्चित असणाऱ्या लोकांचा मला एका दृष्टीने हेवा वाटतो. कारण अशा लोकांना आपल्यासमोर उभ्या असलेल्या प्रश्नांविषयी अधिक सखोल विचार करावा लागत नाही. एखाद्या धर्मावर श्रद्धा असल्यामुळे असो किंवा एखाद्या विचारप्रणालीवर - 'वादा'वर - अढळ विश्वास असल्यामुळे असो, संक्रमण काळात मनाला सतावणाऱ्या 'किम् कर्म, किम् अकर्म' या व्यामोहापासून त्यांची मने मुक्त असतात.

'आणि तरीही, अशा निश्चित श्रद्धांच्या आश्वासनात सर्व काही सुरक्षित आहे असे मानणे यात मानसिक समाधान असले, तरी ते श्रेयस्कर नाही. कारण अशा वृत्तीतूनच प्रगतीचा मार्ग बंद होतो व परागतीकडे आपली वाटचाल सूरू होते.'

**- जवाहरलाल नेहरू**

समाजवादाच्या आशयाविषयी एकमत नाही. असे एकमत होणे अशक्य आहे, याविषयी मात्र एकमत आहे असे म्हणावयास हरकत नाही.

तात्त्विक मांडणीत असे मतभेद प्रगट झाले आहेत. प्रत्यक्ष व्यवहारात तर या भेदांना अनेकदा कडवट विषारी धार चढली आहे.

रशिया, चीन, युगोस्लाव्हिया, झेकोस्लाव्हिया यांसारख्या साम्यवादी राष्ट्रांतील संघर्ष पाहिले तर या विधानाचा प्रत्यय येईल. इंग्लंड - स्वीडनसारखी लोकशाही समाजवादी राष्ट्रे घेतली तर या भेदांची कक्षा अधिकच विस्तृत झाल्याचे दिसून येईल. एकाच राष्ट्रात असणारे अनेक साम्यवादी, समाजवादी राजकीय पक्षांचे व्यवहार पाहिले तरीही हाच अनुभव येईल. डाव्या परिसीमेपासून (extreme left) ते उजव्या परिसीमेपर्यंतच्या (extreme right) विस्तीर्ण पट्ट्यात हे एकमेकांच्या डाव्या - उजव्या बाजूला असणारे गट दाटीवाटीने बसलेले आढळून येतील. केव्हा केव्हा तर एखाद्या तटस्थ निरीक्षकाला दोन गटांतील डावा - उजवा चटकन् ओळखून काढणे कठीण होईल. (भारतातील अशी उदाहरणे वाचकांच्या चटकन् लक्षात येतील. परंतु या लेखाच्या विवेचनाचा तो विषय नसल्यामुळे त्या तपशिलाकडे वळत नाही.) या अनेक मतामतांच्या गलबल्यात व विविध आचारांच्या धुमश्चक्रीत समाजवादाचा मुख्य आशय म्हणून कोणता ओळखावयाचा?

समाजवाद हा एक नुसता तात्त्विक विचार नाही. ते एक 'कुरूक्षेत्र' आहे. या कुरूक्षेत्रावर 'इति मे पार्थ, निश्चित मतमुत्तमम्' अशी समाजवादाची गीता सांगणारा श्रीकृष्ण अजून अवतरावयाचा आहे.

कार्ल मार्क्सने हा प्रेषिताचा आव काही काळ आणला; किंवा त्याची इच्छा नसतानाही त्यांच्या भक्तगणांनी त्याच्या भोवती तसे वलय निर्माण केले असेही म्हणता येईल. परंतु आपल्या कल्पनेप्रमाणे विवेचनाची एक निश्चित चौकट मार्क्सने देण्याचा प्रयत्न केला एवढी गोष्ट खरी.

मार्क्स हा स्वतः मार्क्सवादी नव्हता असे विधान अनेकदा करण्यात येते. परिस्थितीचा वस्तुनिष्ठ अभ्यास करून त्यातून योग्य निष्कर्ष काढण्याचा मार्क्सचा प्रयत्न होता. त्याने काढलेले निष्कर्ष हेच अंतिम मानून त्यानंतर परिस्थितीशी अवधान राखण्याचे कारण राहिले नाही, असे मानणारे मार्क्सवादी लोक हे कडवे पोथीनिष्ठ मार्क्सवादी होत. याउलट परिस्थितीचा वेळोवेळी वस्तुनिष्ठ अभ्यास, पुनरभ्यास करून मार्क्सचे तात्त्विक सिद्धान्त पुनःपुन्हा पारखून घेणे आवश्यक आहे, व जरूर तेथे त्यांच्यात बदल करणे व ज्या सिद्धान्तांचा वस्तुस्थितीशी धागा तुटला असेल, किंवा मार्क्सनेदेखील मुळात केवळ काल्पनिकच धागा जोडला असेल, तेथे ते सिद्धान्त अमान्य करणे या गोष्टीही आपण करणे आवश्यक आहे, असे मानणारे लोक बाह्यतः पोथीनिष्ठ मार्क्सवादाच्या विरोधी वाटले,

अनुक्रमणिका

तरी त्यांची समाजाकडे पाहण्याची मूलभूत वस्तुनिष्ठ दृष्टी ही मार्क्सप्रणीतच होय. या अर्थाने असे लोक हेही मार्क्सचेच अनुयायी, किंबहुना अधिक डोळस अनुयायी होत असं म्हटले पाहीजे.

समाजवादाचा आशय शोधताना मार्क्सच्या विवेचनाचा विचार केल्याखेरीज एक ओळही लिहिणं अशक्य आहे एवढा मोठा त्याच्या विचारसरणीचा प्रभाव समाजवादावर पडला आहे व तो निरंतर राहील. कम्युनिस्ट मॅनिफेस्टो १८४८ मध्ये प्रसिद्ध झाला. त्याच्या आधी केवळ वीस-पंचवीस वर्षेच समाजवाद, (Socialism) हा शब्द आधुनिक अर्थाने रॉबर्ट ओवेन याने वापरला होता व त्याचे अनुयायी हे समाजवादी (Socialists) म्हणून ओळखले जाऊ लागले होते.

कम्युनिस्ट मॅनिफेस्टोने व त्यानंतर 'कॅपिटल' या मार्क्सच्या ग्रंथराजाने व मार्क्सने इतरत्र केलेल्या लेखनाने, या प्राथमिक स्वरूपाच्या समाजवादापासून कितीतरी पुढची उडी घेतली. त्यानंतर आजतागायत विरोधासाठी का होईना मार्क्सच्या विवेचनाचे खंडन केल्याखेरीज समाजवादाचे विवेचन करणे अशक्य होऊन बसले आहे. आज जगातील एकूण एक-तृतीयांश लोकसंख्या साम्यवादी राष्ट्रांत आहे. या राष्ट्रांनी मार्क्सच्या वेदवाक्याचा अर्थ वेगवेगळा लावलेला असला तरी साम्यवादाचे 'वेदवाक्य' ही मार्क्सच्या मांडणीची प्रतिष्ठा त्यांनी कमी होऊ दिली नाही. धर्म न मानणाऱ्या एखाद्या विचारसरणीचा एवढ्या कडव्या धर्मनिष्ठेने प्रचार, व्यवहार व प्रसार इतक्या अल्पकाळात व्हावा ही जगाच्या इतिहासातील एक रोमहर्षक व अद्‌भुत अशी घटना आहे.

हे इतके अकल्पित वेगाने कसे घडले?

एखादी मूलभूत नैतिक प्रेरणा पाठीमागे असल्याखेरीज एखाद्या विचारप्रणालीला असा सार्वत्रिक वेग येत नाही.

●●●

एका दृष्टीने समाजवादाच्या पाठीमागील ही प्रेरणा मानवी संस्कृतीच्या मानसात सतत वसत आलेली मूलभूत मानवतावादी प्रेरणाच आहे.

सर्वेऽत्र सुखिन : सन्तु। सर्वे सन्तु निरामया :।
सर्वे भद्राणि पश्यन्तु। मा कश्चिद् दु:खमाप्नुयात्।।

हीच ती प्रेरणा होय. सर्व धर्म याच प्रेरणेने अनुप्रणीत झालेले आहेत. साधुसंतांच्या जीवनात याच प्रेरणेचा प्रभाव आढळून येत आलेला आहे.

मग समाजवादाचे या बाबतीत वैशिष्ट्य काय?

ते वैशिष्ट्य असे : एकतर, औद्योगिक क्रान्ती होऊन मानवाची उत्पादनशक्ती वाढेपर्यंत या इच्छेला एका सदिच्छे-खेरीज अधिक महत्त्व प्रत्यक्षात येऊ शकत नव्हते. उत्पादन मर्यादित होते व कुटुंबनियोजनाच्या साधनांच्या व वृत्तीच्या अभावी बहुसंख्य लोकसंख्येला निकृष्ट उपासमारीचे जीवन जगावे लागणे अटळ होते. माल्थसच्या लोकसंख्येच्या सिद्धांताचा प्रत्यय सर्व जगात त्याच्या ग्रंथाच्या पूर्वीच्या कालखंडातच येत होता. अठराव्या शतकाच्या अखेरीस माल्थसचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्याच्या आधी काही दशके इंग्लंडमध्ये नव्याने शोध लागलेल्या यंत्रांच्या साहाय्याने औद्योगिक क्रान्तीला सुरवात झाली होती. उत्तरोत्तर आणखीही नवीन यंत्रे अस्तित्वात आली व एकोणिसाव्या शतकात फ्रान्स, जर्मनी, अमेरिका यांसारख्या राष्ट्रांतूनही औद्योगिक क्रान्ती सिद्ध झाली. मर्यादित उत्पन्नाच्या चणचणीतून मानवता मुक्त होण्याची शक्यता प्रथमच निर्माण झाली. यामुळे सर्वजण सुखी व्हावेत ही इच्छा सदिच्छेच्या पलीकडे जाऊन प्रत्यक्षात उतरण्याची शक्यता ज्या कालखंडात निर्माण झाली, त्याच कालखंडात व त्याच कालखंडाच्या पार्श्वभूमीवर समाजवादाचा उदय झाला.

या उत्पन्नाची वाटणी अधिक समप्रमाणात करणे हेच यामुळे सुखी समाजनिर्मितीसाठी करावयाचे मुख्य कार्य होऊन राहिले. येथेही समाजवादाने (किंवा अधिक नेमकेपणाने म्हणावयाचे तर कार्ल मार्क्सने) पूर्वीच्या धार्मिक किंवा साधुसंतांच्या विचारसरणीच्या पुढे एक महत्त्वाचे पाऊल टाकले. धर्मांची, साधुसंतांची अपेक्षा ही धनिकांनी गरिबांच्या कळवळ्याने त्यांचे दु:ख दूर करावे अशी भूतदयावादी होती. मार्क्स अशा भूतदयावादावर विसंबून नव्हता. औद्योगिक क्रान्तीसह जन्मास आलेल्या भांडवलशाहीचे विश्लेषण करून मार्क्सने असे दाखवून दिले की, भांडवलशाहीचा पुढचा टप्पा म्हणून विषमता नष्ट करून उत्पन्नाचे वाटप सर्वांना समान करणारा समाजवाद अस्तित्वात येणे हा इतिहासक्रम अटळ आहे. हे गतिचक्र कोणालाही अंतिमरीत्या थांबविता येणार नाही. जागृत साम्यवादी क्रान्तिकारक या चक्राची गती अधिक अधिक वाढवू शकतील. याउलट, हितसंबंधी गटाचे लोक किंवा मूर्ख प्रतिक्रान्तिकारक या चक्राची गती रोखण्याचा प्रयन्त करू शकतील; परंतु मुख्यत्वे-करून हे गतिचक्र भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या अंतर्गत रचनेचा परिणाम म्हणून चाललेले असल्यामुळे ते कोणालाही थांबविता येणार नाही. जे हे चक्र रोखण्याचा प्रयन्त करतील ते त्याच्याच खाली चिरडले जाऊन नष्ट होतील.






या अंतर्गत रचनेचे स्वरूप आपण आणखी थोड्या अवधीने पाहू. 'सर्वेऽत्र सुखिनः सन्तु' या मानवतावादी प्रेरणेला मार्क्सने असे अपरिहार्यतेचे शास्त्रीय अधिष्ठान मिळवून दिले, ही गोष्ट आपल्या सध्याच्या विवेचनाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाची आहे.

'सर्वेऽत्र सुखिनः सन्तु' ही कारूणिक नैतिक प्रेरणा हे समाजवादाचे भावनात्मक इंधन आहे. याच भावनेच्या प्रभावाखाली लोक आनंदाने सर्वस्वाच्या यज्ञाला तयार होतात. अशा लोकांना मार्क्सवादाने असे बलवत्तर आश्वासन दिले की, या यज्ञात तुमची आहुती पडली तरी हा यज्ञ शेवटी यथासांग यशस्वी होणे ही गोष्ट अटळ आहे. धर्म हेच आश्वासन काल्पनिक स्वर्गाच्या आधारावर देत असे. 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्' या आश्वासनाच्या आधारावर सर्व धर्मांच्या सेना धार्मिक युद्धे लढत आल्या आहेत. मार्क्सने हे आश्वासन 'शास्त्रीय' (Scientific) विवेचनाच्या आधारे दिले. मार्क्सच्या विवेचनावर विश्वास असणारा मार्क्सवादी यामुळे आपल्या पक्षाच्या अंतिम विजयाविषयी कधीच संदेहात नसतो व दलितांचे कल्याण व्हावे या सद्भावनेचे मिश्रण या दर्शनात झाले, की आनंदाने आत्माहूती करण्याची कडवी निष्ठा त्याच्यात निर्माण होते.

'धर्म ही अफूची गोळी आहे' असा मार्क्सचा धर्मावरील आरोप होता. स्वर्ग, नरक, पुनर्जन्म, न्यायाचा दिवस (Day of Judgment) यांसारख्या कल्पनांनी धर्म दलितांना गुंगीत टाकतो व वरिष्ठ वर्गाविरूद्ध द्यावयाच्या लढ्याची धार बोथट करतो, असा मार्क्सचा धर्मावरील आक्षेप होता. सर्व रूढ धर्मांतील पुष्कळशा भागाला हा आरोप लागू पडण्यासारखा आहे. परंतु मार्क्सवाद हाही एक धर्मच आहे, असे जे विधान अनेकदा केले जाते, त्यातील सत्यांश आपण ओळखला पाहिजे. मार्क्सवाद स्वर्ग, नरक, पुनर्जन्म, न्यायाचा दिवस, धार्मिक परंपरा, रूढी मानत नाही. परंतु दलितांचे कल्याण व्हावे ही प्रेरणा व या युद्धासाठी उभ्या राहणाऱ्या आपल्या पाइकांना अंतिम यशाचे आश्वासन या कोणत्याही धर्माच्या महान कार्यकारी प्रेरणा याच मार्क्सवादाच्याही प्रेरणा आहेत आणि याच अर्थाने मार्क्सवाद हाही एक धर्मच आहे. परंतु केवळ तेवढ्याच अर्थाने हे विधान सत्य आहे हे मात्र आपण विसरता कामा नये.

'नरकाच्या मार्गावर सद्हेतूंचीच फरसबंदी केलेली असते' अशा अर्थाचे एक इंग्रजी वचन आहे. मानवाच्या कल्याणाच्या प्रतिज्ञेने अस्तित्वात आलेल्या मार्क्सवादालाही प्रत्यक्ष इतिहासात या वचनाचा प्रत्यय यावयाचा होता. साम्यवादाविषयी सहानुभूती वाटणारे अनेक लोक, रशियन क्रांतीनंतर तेथे अस्तित्वात आलेली हुकूमशाही व हिंसाचार पाहून देवाच्या दर्शनास गेल्यानंतर वेताळ दृष्टीस पडावा असे भयचकित होऊन साम्यवादापासून पराङ्मुख झाले व खऱ्या राउळाच्या दिशेने जाण्याचा दुसरा एखादा मार्ग सापडतो का, हे ते चाचपडत शोधू लागले.

मार्क्सने दिलेल्या निश्चित 'शास्त्रीय' मार्गदर्शनाचा अशा लोकांचा आधार आता तुटला होता. प्रत्यक्ष परिस्थितीच्या संदर्भात व मानवी कल्याणाचा अंतिम संदर्भ राखून प्रत्येक वेळी आपण आपले निर्णय घेतले पाहिजेत हा मार्क्सचा मूलभूत संदेश हाच त्यांचा मार्क्सवादाशी आता धागा राहिला होता. 'मानवी कल्याण' मूलतः कशात सामावले आहे, व ते कोणत्या व्यावहारीक मार्गाने सिद्ध करता येईल यातील मतभेदामुळेच समाजवादाच्या विविध प्रणालींतील आशयात फरक पडत गेला आहे.

●●●

मार्क्स हा भांडवलशाही अर्थव्यवस्थेचा अत्यंत प्रखर व अत्यंत प्रभावी टीकाकार. मार्क्सने आपले विवेचन करण्यापूर्वीही भांडवलशाहीतील दोष सहृदय निरीक्षकांच्या नजरेस येऊ लागले होते. श्रीमंत व गरीब यांच्यात प्रचंड दरी निर्माण झाली होती व गरिबांचे जीवनमान कमालीचे निकृष्ट होते. कोणाही सहृदय माणसाच्या अंतःकरणाला पाझर फोडील अशीच ही घटना होती. यंत्रामुळे ही आपत्ती आली, असे प्रथमदर्शनी वाटत होते. यामुळे संतापून जाऊन काही वेळा लोकांनी दंगेधोपे करून यंत्राचीच मोडतोड केली. काही जणांनी यंत्रयुगापासून मागे जाऊन आपण पुन्हा मध्ययुगीन शांत, स्वस्थ जीवनाकडे परत वळले पाहिजे असा प्रचार सुरू केला, तर रॉबर्ट ओवेनसारखे काही मानवतावादी कारखानदार आपल्या कारखान्यातील मजुरांची परिस्थिती कशी सुधारता येईल या दृष्टीने विचार आणि कार्य करू लागले. धनिकांच्या भूतदयेने हा प्रश्न सुटू शकेल अशी काहींची भाबडी आशा होती, तर काहीजण आपल्याला आदर्श वाटणाऱ्या समाजपद्धतीच्या प्रत्यक्ष छोट्या छोट्या वसाहती निर्माण करण्याच्या प्रयत्नाला लागले होते.

मार्क्सने या अशा सर्व प्रयत्नांची काही मूर्खपणाचे प्रयत्न म्हणून तर काही 'स्वप्नाळू (utopian) समाजवाद' म्हणून बोळवण केली. भांडवलशाहीच्या या प्रखर टीकाकाराने भांडवलशाही अर्थव्यवस्थेचे विधायक कर्तृत्व मोकळेपणाने मान्य केले व त्याचा गौरव केला. पूर्वीच्या सरंजामशाही अर्थव्यवस्थेच्या तुलनेने भांडवलशाहीने कितीतरी अधिक मोठ्या प्रमाणात उत्पादनशक्ती मानवाला उपलब्ध करून दिलेली आहे










व याचे श्रेय आपण भांडवलशाहीला दिले पाहिजे, असे मार्क्सने कम्युनिस्ट जाहीरनाम्यात स्पष्टपणे सांगितले आहे. यामुळे यंत्रे नष्ट करणे किंवा मध्ययुगाकडे त्या काळातील शांतीच्या व स्वास्थ्याच्या भ्रामक कल्पनांमुळे परत वळणे हा मार्क्सच्या दृष्टीने शुद्ध वेडाचार होता. हाती आलेली अधिक उत्पादनशक्ती मानव सोडावयास तयार होईल हे शक्य नव्हते व मार्क्सच्या दृष्टीने त्याची आवश्यकताही नव्हती. नवनवीन शोध लागून या शक्तीत भर पडली तर तेही स्वागतार्हच होते.

यंत्रे ही वरदान आहेत; परंतु ज्या पद्धतीने भांडवलशाही अर्थव्यवस्थेत त्यांचा वापर होतो, त्या पद्धतीमुळे ती शाप ठरतात असे मार्क्सचे सांगणे होते. भांडवलशाहीत भांडवल खाजगी व्यक्तींच्या मालकीचे असते. या भांडवलापासून हे भांडवलदार अधिकात अधिक नफा मिळवण्याचा प्रयत्न करीत असतात. यामुळेच मजुरांना पुरेसे वेतन दिले जात नाही व त्यांची पिळवणूक होते, व श्रीमंत आणि गरीब यांमध्ये प्रचंड दरी निर्माण होते.

या पिळवणुकीपासून जर मजुरांची सुटका करावयाची असेल तर उत्पादनांची साधने (भांडवल) खाजगी मालकीची न ठेवता समाजाच्या (राष्ट्राच्या) मालकीची केली पाहिजेत, हा मार्क्सने सुचविलेला यावरील उपाय होता. खाजगी भांडवलदार नाहीसे झाले की, उत्पादन खाजगी भांडवलदारांच्या नफ्याच्या प्रेरणेने होण्याऐवजी समाजाच्या गरजेच्या दृष्टीने व्हावयास लागेल व मजुरांच्या पिळवणुकीचे कारण राहणार नाही असे मार्क्सचे विवेचन होते. भांडवलदारांचा निरास केल्यानंतर राज्य मजुरांचेच असणार व मग त्यात कोणाची कोण पिळवणूक करणार?

परंतु खाजगी भांडवलदारांचा निरास कसा होणार? मांजराच्या गळ्यात घंटा कोण बांधणार? मार्क्सने याचेही उत्तर दिले आहे. भांडवलशाही आपली कबर आपणच खोदत असते असे त्याचे म्हणणे आहे. परस्परांतील जीवघेण्या चढाओढींमुळे भांडवलदारवर्गाचा आकार उत्तरोत्तर संकोच पावत असतो, तर शोषित मजूरवर्गाचा आकार उत्तरोत्तर वाढत असतो. मजूरवर्ग बहुसंख्य असतो व प्रत्यक्ष उत्पादनाचे कार्य हाच वर्ग करत असतो. यामुळे भांडवलदारवर्गाचे व आपले हितसंबंध परस्पर-विरोधी आहेत व भांडवलदारवर्गाचा निरास केल्याखेरीज आपले शोषण थांबणार नाही, याची वर्गीय जाणीव मजूरवर्गाला होऊन तो संघटित झाला, की होणाऱ्या वर्गसंघर्षात मजूरवर्गाचा विजय होणे अटळ आहे अशी मार्क्सची मांडणी होती.

●●●

या विवेचनाप्रमाणे साम्यवादी क्रान्ती प्रथम औद्योगिकदृष्ट्या प्रगत अशा राष्ट्रात होईल. या राष्ट्रात मजूरवर्ग मोठ्या संख्येने असतो. मध्यमवर्गीय बुद्धिजीवी लोक या मजूरवर्गाला संघटित करण्याचे कार्य करतील व या क्रान्तीचे मार्गदर्शन करतील. कृषितवर्ग हा मजूरवर्गाच्या मागोमाग क्रान्तीत खेचला जाईल.

ही क्रान्ती हिंसक मार्गाने होईल की अहिंसक मार्गाने होईल? आपद्धर्म म्हणून मार्क्सला हिंसा अमान्य नव्हती व अनेक राष्ट्रांतून हिंसक क्रान्तीशिवाय हे परिवर्तन होऊ शकणार नाही, असे तो मानत होता. परंतु ज्या राष्ट्रात लोकशाही दृढमूल झालेली असेल तेथे हिंसाचाराखेरीज हा बदल घडून येऊ शकेल अशी शक्यता मार्क्स नाकारत नव्हता. मार्क्सने याविषयीचे आपले विचार १८७२ मध्ये फर्स्ट इंटरनॅशलच्या हेग येथे भरलेल्या अधिवेशनापुढे भाषण करताना स्पष्टपणे मांडलेले आहेत. मार्क्स म्हणतो, "नवीन समाजव्यवस्था अस्तित्वात आणण्यासाठी मजुरांच्या हातात सत्ता येणे आवश्यक आहे; परंतु ही सत्ता काबीज करण्याचा मार्ग प्रत्येक देशात सारखाच असेल असा माझा आग्रह नाही. प्रत्येक देशातील वेगवेगळ्या संस्था, परंपरा, रूढी इत्यादी परिस्थितीच्या संदर्भात आपल्याला या गोष्टीचा विचार करावा लागेल; आणि इंग्लंड, अमेरिका यांसारख्या राष्ट्रांत (किंवा तुमच्या देशातील परिस्थिती मला नीट समजली असेल तर हॉलंडमध्ये देखील) मजूरवर्ग शांततेच्या मार्गाने आपले ध्येय साध्य करू शकेल ही शक्यताही मी नाकारत नाही. परंतु सर्वच देशांत अशी परिस्थिती असेल असे नाही."

प्रत्यक्ष इतिहासात असे दिसून आले की, साम्यवादी क्रान्त्या औद्योगिकदृष्ट्या प्रगत देशांत घडून आल्या नाहीत, तर अप्रगत किंवा अर्धप्रगत अशा रशिया, चीन, युगोस्लाव्हिया व इतर पूर्व युरोपातील राष्ट्रांतून घडून आल्या. या राष्ट्रांत औद्योगिक विकास झालेला नसल्यामुळे मजूरवर्गाने या क्रान्तीचे नेतृत्व करणे अशक्य होते. त्या त्या राष्ट्रात एका एका सुसंघटित साम्यवादी पक्षाच्या नेतृत्वाने ही क्रान्ती केली गेली. रशियात क्रान्ती झाल्यानंतर इतर राष्ट्रांतील क्रान्त्यांना या राष्ट्राकडून मार्गदर्शन, नेतृत्व व लष्करी आणि इतर साहाय्य मिळाले. या राष्ट्रांतून मजूरवर्गाइतकेच किंबहुना त्याहूनही अधिक महत्त्व कृषिकवर्गाला आहे हा साक्षात्कारही साम्यवादी चळवळीला या कालखंडात झाला.

या सर्व क्रान्त्यांतून एक गोष्ट ठळकपणे निदर्शनास आली. क्रान्तीची वाटचाल मार्क्सने आखून दिलेल्या मार्गाने होण्याऐवजी त्या त्या देशकालाला अनुरूप अशा मार्गाने होत असते आणि आर्थिक कारणाखेरीज राजकीय नेतृत्व व अंतर्गत व आंतरराष्ट्रीय राजकीय परिस्थिती यांचा या क्रान्तीच्या सिद्धतेत








अनुक्रमणिका

फार मोठा वाटा असतो.

ही गोष्ट मान्य करणे पोथीनिष्ठ मार्क्सवाद्यांना अवघड वाटावे यात आश्चर्य नाही. परंतु रशियातील सर्व घटनांचे व स्टॅलिनच्या सर्व अत्याचारांचे खापर मार्क्सवादावर फोडू पाहणाऱ्या मार्क्सवादाच्या विरोधकांनीही या गोष्टीचा आपल्याला विसर पडू दिला. रशियातील रक्तपात, हिंसा, हुकुमशाही यांचा रशियात ज्या पार्श्वभूमीवर व ज्या परिस्थितीत क्रान्ती झाली तिच्याशी संबंध किती आहे व मार्क्सवादी सूत्रांचा अटळ परिणाम म्हणून या गोष्टी रशियात किती प्रमाणात अस्तित्वात आलेल्या आहेत, याचा विचार होणे आवश्यक आहे. सर्वच चांगल्या गोष्टींचे श्रेय स्टॅलिनला देण्याचा प्रयत्न हा जसा 'व्यक्तिश्रेयवाद' (personality cult) म्हणून स्टॅलिननंतर निंदास्पद ठरला, त्याप्रमाणे सर्वच वाईट गोष्टींचे खापर स्टॅलिनवर किंवा मार्क्सवादावर टाकण्यात आपण उलट रीतीने 'व्यक्तिश्रेयवाद' किंवा 'वादश्रेयवादच' तर स्वीकारत नाही ना हे पाहिले पाहीजे.

रशियातील घटनांचा निवाडा करणे हा या लेखाचा हेतू नसल्यामुळे हे विवेचन आपल्याला येथे अधिक लांबवावयाचे कारण नाही. कोणत्याही एका राष्ट्राचे अनुभव दुसरे राष्ट्र सर्वस्वी किंवा त्याज्य असे तडकाफडकी ठरवू शकत नाही एवढाच यातून घ्यावयाचा बोध आहे.



साम्यवाद व समाजवाद या दोन शब्दांचा सरमिसळ वापर अनेकदा झाला असल्याचे आपल्याला आढळून येते. 'समाजवाद' या शब्दाचा आधुनिक अर्थाने प्रथम वापर रॉबर्ट ओवेन याने एकोणिसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात केला असे मानण्यात येते. या अशा समाजवादापासून आपला वेगळेपणा स्पष्ट व्हावा म्हणून मार्क्सने आपल्या जाहिरनाम्याला कम्युनिस्ट जाहीरनामा असे नाव दिले. (कम्यूनची - एकत्रित सामुदायिक जीवनाची - कल्पना मानवप्राणी टोळीपद्धतीने राहत होता तेव्हापासूनची जुनी आहे.) एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस व पहिल्या महायुद्धापर्यंतच्या कालात हे दोन्ही शब्द सरमिसळपणे वापरले जाऊ लागले. रशियात क्रांती झाल्यानंतर लेनिनने पुन्हा 'साम्यवाद'हा शब्द कटाक्षाने वापरावयास सुरुवात केली व क्रांती यशस्वी झाल्यानंतर अस्तित्वात येणारा पहिला टप्पा ( मार्क्सच्या शब्दात - First phase) 'समाजवाद' म्हणून संबोधून दुसऱ्या अंतिम टप्याला लेनिनने 'साम्यवाद' हे नाव दिले. म्हणजे समाजवादी क्रांती पूर्णपणे यशस्वी होऊन दृढमूल झाल्यानंतर तिची परिणती साम्यवादात होईल अशी अपेक्षा आहे. साम्यवादी अवस्था सिद्ध झाल्यानंतर राज्यसंस्था लयाला जाईल व 'कुवतीप्रमाणे काम व गरजेप्रमाणे दाम' (From each according to his ability, to each according to his needs) या साम्यवादी सूत्राप्रमाणे संपत्तीचे उत्पादन व विभाजन होऊ लागले. मार्क्सला अभिप्रेत असलेली शेवटची परिणत अवस्था ती हीच होय.

आपल्या अलीकडील वाक्प्रचारात आपण साम्यवाद व समाजवाद यांत करतो तो भेद याहून ढोबळ असतो. कधी कधी साम्यवाद - हिंसा = समाजवाद असे याचे सोपे समीकरणही मांडले जाते. 'माझा जर अहिंसेवर विश्वास नसता तर मी साम्यवादी झालो असतो' यासारखे विनोबाजींचे उद्‌गार किंवा अहिंसक मार्ग असफल झाले, तर नक्षलवादी मार्ग अपरिहार्य आहे, असे सांगणारी जयप्रकाशजींची वचने या समीकरणाला पुष्टीच देतात. (सर्वोदय हा ८० टक्के समाजवादच आहे असे जयप्रकाशजींनी प्रतिपादन केले आहे. यामुळे सर्वोदयाविषयीचे हे समीकरण समाजवादालाही लागू करता येते). परंतु हा केवळ हिंसेच्या वजावाकीचा प्रश्न नाही, हे स्पष्टपणे ओळखणे आवश्यक आहे. हिंसेच्या आचाराने क्रांतीच्या संपूर्ण स्वरूपातच फरक पडतो. नराचा नारायण होणार की नरराक्षस होणार एवढा फरक या वजाबाकीमुळे पडू शकतो.

तसे पाहिले तर सर्वोदयवाद्यांना हवा असणारा शासनविहीन समाज व साम्यवाद्यांना अभिप्रेत असणारा शासनसंस्थेचा विलय (withering away of the State) यात काय फरक आहे? साम्यवादी तर शासनसंस्थेचा लय हा अटळपणे होणारच, असे दाखवून देतात. कारण त्यांच्या विवेचनाप्रमाणे शासनसंस्थेचे अस्तित्वच मुळी एका वर्गाची दुसऱ्या वर्गावर हुकमत चालावी यासाठी असते. यामुळे वर्गविहीन समाज स्थापन होऊन एका वर्गाने दुसऱ्या वर्गावर वर्चस्व गाजविण्याचे कारण उरले नाही, की शासनसंस्थेच्या अस्तित्वाचे कारणच न उरल्यामुळे तिचा आपोआप विलय होतो. प्रत्येकाने आपल्या शक्तीप्रमाणे समाजासाठी काम करावे व समाजाकडून आपल्या गरजेप्रमाणे घ्यावे, अशीच विभाजनाच्या क्षेत्रातही सर्वोदयाची अपेक्षा नाही काय? वर्तुळाची दोन विरूद्ध टोके एकत्र मिळतात ती अशी.

परंतु खरोखरच सर्वोदय - साम्यवादाची ही एकांतिक टोके असी मिळू शकतील काय? या प्रश्नाचे उत्तर 'सुतराम् ही शक्यता नाही' असेच दिले पाहिजे. ज्या ज्या राष्ट्रात साम्यवादी क्रांती घडली आहे, त्या प्रत्येक राष्ट्रातील अनुभव या दृष्टीने विपरीत असाच आहे. त्या राष्ट्राची वाटचाल शासनसंस्थेच्या निरासाच्या दिशेने चालली नसून शासनसंस्था हुकूमशाही सामर्थ्याने बलवत्तर करण्याकडे झालेली आहे. ही हुकूमशाही

शेवटी लयाला जाऊन खऱ्या लोकशाहीचा या राष्ट्रात उदय होईल अशी आशा बाळगण्यास आजपर्यंतचा इतिहास तरी आपल्याला अवसर देत नाही. आजची रशियातील हुकूमशाही स्टॅलिनच्या हुकूमशाहीइतकी जुलमी नसली तरी ती हुकूमशाहीच आहे व जुलूम करणे वा न करणे हा हुकूमशहाच्या स्वच्छंद खेळाचा एक प्रकार होऊ शकतो.

'लोकशाही आशय' हा साम्यवाद व समाजवादातील विभिन्नतेचा सर्वप्रमुख निकष आहे. साम्यवादी लोक हाताशी उपलब्ध असतील त्या कोणत्याही साधनांचा वापर करून क्रान्ती घडवून आणणे हे आपले आद्यकर्तव्य मानतात. त्यांच्या दृष्टीने साध्य हे सर्वोच्च महत्त्वाचे असते. ते मिळविण्यासाठी कोणती साधने वापरावयाची हा गौण प्रश्न असतो. राष्ट्रात संसदीय लोकशाही अस्तित्वात असली तर लोकसभेत प्रवेश करून, मंत्रिमंडळात स्थान मिळवून, महत्त्वाची खाती आपल्या पक्षीय धोरणासाठी राबवून, शक्य तेव्हा इतर पक्षांना व लोकशाहीलाही गुंडाळून ठेवण्याची मनमोकळी तयारी साम्यवादी ठेवू शकतात. कारण भांडवलशाही चौकटीत नांदणारी लोकशाही ही भांडवलदारांची बटीक असते व आर्थिक समता स्थापन झाल्याखेरीज खरी लोकशाही अस्तित्वात येऊ शकत नाही, असाच मुळी त्यांचा सिद्धान्त असतो. आपला हा वेगळेपणा स्पष्ट करण्याच्या दृष्टीनेच साम्यवादी राष्ट्रातील शासनाचे वर्णन ते 'लोकांची लोकशाही' (people's democracy) अशा द्विरुक्त नामभिधानाने करतात.

आर्थिक विषमता शुद्ध लोकशाहीला बाधक असते, हे विधान मान्य करूनही साम्यवादी शासनाचे वर्णन 'लोकशाही' या विशेषणाने करणे दुर्घट आहे. व्यक्तिस्वातंत्र्य (विचार, उच्चार, प्रचार, संघटन) हा लोकशाहीचा प्राण आहे. असे व्यक्तिस्वातंत्र्य आज साम्यवादी राष्ट्रांतून अस्तित्वात आहे असा दावा कट्टर साम्यवादीही करू शकणार नाहीत. साम्यवादी राष्ट्रांतून अस्तित्वात असणारी हुकूमशाही मार्क्सने परिवर्तनाच्या काळात (transition period) आवश्यक म्हणून सांगितलेली कामगारवर्गाची हुकूमशाही आहे असा दावा कदाचित ते मांडण्याचा प्रयत्न करतील; परंतु हा परिवर्तनाचा काळ कधी संपुष्टात येतो असा आजवरचा अनुभव नाही व कामगारवर्गाच्या हुकूमशाहीचे जे स्वरूप साम्यवादी राष्ट्रांतून आढळत आहे, ते मार्क्सला अभिप्रेत असलेल्या रूपाहून कितीतरी वेगळे आहे हेही त्यांना मान्य करावे लागेल. कामगारवर्गाच्या हुकूमशाहीच्या नावाखाली एखादा मर्यादित गट आपली हुकूमशाही कामगार वर्गावरदेखील प्रस्थापित करील हे मार्क्सला अपेक्षित नव्हते. या गटातही एखाददुसरी व्यक्तीच सर्वंकष हुकूमशहा होऊन राहील, अशी तर त्याची कल्पनां नव्हतीच नव्हती.

व्यक्तिस्वातंत्र्याची बूज असणाऱ्या, परंतु संसदीय लोकशाहीच्याही मर्यादा ओळखणाऱ्या लोकांनी या दृष्टीने अधिक विचार करण्याची गरज आहे. संसदीय लोकशाही हा लोकांच्या तोंडाला पाने पुसण्याचाच एक संभावित मार्ग आहे असे सिद्ध झाले किंवा अशी रास्त शंकादेखील लोकांना आली, तर दरिद्री देशांतून आजच्या परिस्थितीत हिंसक क्रान्ती अटळ आहे. संसदीय लोकशाही अपुरी पडेल किंवा चुकीच्या मार्गाने जाऊ लागेल, त्या वेळी तिला मार्गावर आणण्यासाठी व कार्यप्रवण करण्यासाठी जन-आंदोलनाची आवश्यकता राहील, किंबहुना अशा जनआंदोलनाची शक्यता हा संसदीय लोकशाहीचा एक अवश्यमेव पूरक भागच मानला गेला पाहीजे. समाजव्यवस्थेवर विपरीत परिणाम होऊ न देता अशी जनआंदोलने कशी चालवावीत याचे आदर्श वस्तुपाठ सत्याग्रह-आंदोलनांच्या प्रयोगांनी गांधीजींनी दिलेले आहेत. गेल्या वीस वर्षांत हे वस्तुपाठ आपण विसरलो आहोत. सत्याग्रहाच्या नावाखाली आपण केलेला आचार हाही अनेकदा त्या नावाची विटंबना करणारा विपरीत स्वरूपाचा होता; परंतु हे शस्त्र आणि त्याचे शास्त्र आम्हाला कोणी सांगितले नव्हते, असा दावा निदान भारतीयांना तरी करता येणार नाही.



व्यक्तिस्वातंत्र्यावर अधिष्ठित अशा लोकशाहीचे वातावरण अबाधित राखून समाजवादाच्या दृष्टीने वाटचाल करण्याचे श्रेय इंग्लंड, स्वीडन यांसारख्या लोकशाही समाजवादी राष्ट्रांनी मिळविलेले आहे, एकाही अप्रगत राष्ट्राने अशी वाटचाल यशस्वीपणे केल्याचे आजवरचे उदाहरण नाही. भारताला या दिशेच्या वाटचालीचा मार्ग आपला आपणच शोधून काढला पाहिजे.

प्रगत राष्ट्रांतील परिस्थिती अशा प्रयोगाला किती तरी अधिक अनुकूल असते. समृद्धी साध्य झालेली असते. या समृद्धीच्या समविभाजनाचा तेवढा प्रश्न असतो. हे सम-विभाजनही काही प्रमाणात कालौघात सहजपणे घडून आलेल्या घटनांनी साध्य होत आलेले आहे. मजुरांची सदैव निःशेष पिळवणूक होत राहील ही मार्क्सवादाची अपेक्षा या राष्ट्रांतून चूक ठरली आहे. त्या राष्ट्रांतील मजुरांचे जीवनमान उत्तरोत्तर चढते वाढते राहिलेले आहे. मजूर संघटनांच्या कार्याचा यात वाटा आहे ही गोष्ट खरी; परंतु मजुरांना असा न्याय मिळाला पाहिजे असे सर्वसाधारण वातावरणही त्या राष्ट्रांत निर्माण झालेले आहे, ही गोष्टही नाकारता येणार नाही. पराकोटीच्या शोषणातून व

दारिद्र्यातून प्रचलित अर्थव्यवस्थेविषयी निर्माण होणारी विषारी कडवट चीड त्या राष्ट्रांत त्यामुळेच निर्माण होऊ शकत नाही. राष्ट्रात सर्वांना त्यांच्या बेकारीच्या, आजारीपणाच्या, अपघाताच्या, वृद्धावस्थेच्या अशा अडचणीच्या काळात काही किमान सामाजिक संरक्षण मिळाले पाहिजे, ही तात्त्विक भूमिका आता अमेरिकेसारख्या कट्टर भांडवलशाही राष्ट्रात देखील मान्य झाली आहे. आपल्या एकूण समृद्धीतून व धनिक वर्गावर लादलेल्या चढत्या श्रेणीच्या करआकारणीतून असे सामाजिक संरक्षण सर्व नागरिकांना देणे त्या राष्ट्रांना शक्य झाले आहे. प्रगत भांडवलशाही राष्ट्रे आता कल्याणकारी राज्ये झालेली आहेत व या राष्ट्रांतील श्रीमंत व गरीब वर्गातील अंतर परिणामकारकपणे कमी झालेले आहे. साहजिकच अशा राष्ट्रांत साम्यवादाचा कडवा प्रचार होऊ शकत नाही.

भांडवलशाहीने समृद्धीची शक्यता निर्माण केली असली तरी भांडवलशाही अर्थव्यवस्था पुनःपुन्हा तेजीमंदीच्या अर्थचक्रात सापडते व मंदीच्या काळात उत्पादन थांबल्यामुळे उत्पादनवाढीच्या कसोटीवर देखील त्या काळात उणी पडते, असा मार्क्सवादाचा सिद्धान्त भांडवलशाही अर्थव्यवस्थेवरील पहिल्यापासूनचा आक्षेप आहे. भांडवलशाहीचे मुख्य कळसूत्र नफ्याची प्रेरणा हे असल्यामुळे कोणत्याही कारणाने अपेक्षित नफ्याची शक्यता नाहीशी झाली, की भांडवलदार उत्पादन थांबवतात. कच्चा माल आहे, यंत्रसामग्री आहे, मजूर आहेत, जनतेला जीवनासाठी उत्पादन आवश्यक आहे, परंतु बाजारात योग्य तो भाव येत नाही म्हणून उत्पादन थांबले आहे व काही वेळा तर बाजारातील पुरवठा कमी करून भाव चढविण्याच्या हेतूने उत्पादित वस्तूंचा नाश करण्यात येत आहे व जनतेची केवळ तिच्याकडे पुरेशी क्रयशक्ती नाही म्हणून उपासमार चाललेली आहे, असे विपरीत दृश्य मंदीच्या काळात दिसू लागते. उत्पादनाची साधने आहेत व लोकांना जीवनासाठी उत्पादन हवे आहे, अशा परिस्थितीत समाजवादी अर्थव्यवस्थेत अशा प्रकारे उत्पादनात खीळ बसणार नाही. कारण समाजवादी अर्थव्यवस्था खाजगी नफ्याच्या प्रेरणेवर चालत नसते. भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या तुलनेत समाजवादी अर्थव्यवस्थेचा हा मोठा विधायक विशेष आहे असे सांगण्यात येते.

या विशेषाच्या सर्व तपशिलात या ठिकाणी आपल्याला जाता येण्यासारखे नसले, तरी हा विशेष कोणी अमान्य करीत नाहीत, एवढे विधान सध्याच्या विवेचनाच्या दृष्टीने पुरेसे आहे. परंतु केन्स या सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञाने भांडवलशाहीला तेजीमंदीच्या अर्थचक्रातून बाहेर कसे काढता येईल व राष्ट्रात सतत पूर्ण रोजगारीची अवस्था अस्तित्वात ठेवण्याचा प्रयन्त भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या चौकटीतही कसा करता येईल, याचे सुस्पष्ट व व्यावहारिक अर्थकारणाच्या दृष्टीने उपयोगी असे विवेचन केल्यानंतर या विशेषाचे महत्त्वही फारसे उरले नाही.

प्रगत भांडवलशाही राष्ट्रांनी अशा रीतीने दारिद्र्याचा प्रश्न सोडविला, श्रीमंत व गरीब यांच्यातील अंतर उत्तरोत्तर कमी करीत आणले, तेजीमंदीच्या चक्राच्या आपत्तीचा आघात चुकविण्याचा किंवा सुसह्य करण्याचा मार्ग शोधून काढला व पूर्ण रोजगारीची अवस्था टिकविण्याविषयी ही राष्ट्रे दक्ष राहू लागली. अनिर्बंध अर्थव्यवस्थेचे (laissez-faire) भांडवलशाहीच्या प्रारंभीच्या काळात आग्रहाने पुरस्कारले गेलेले तत्त्व या राष्ट्रांतून आता मागे पडले आहे. आज अर्धशतकाहून अधिक काळ ही सर्व राष्ट्रे आपल्या अर्थव्यवस्थेत सार्वजनिक हिताच्या दृष्टीने अनेक वेळा प्रभावीपणे हस्तक्षेप करीत असल्याचे आढळून येते. आवश्यक वाटेल त्या उद्योगधंद्याचे राष्ट्रीयीकरणही ही राष्ट्रे करू लागली आहेत.

केवळ व्यक्तिगत स्वार्थावर आधारित व 'बळी तो कान पिळी' हा जंगलचा कायदा मानणाऱ्या अनिर्बंध अर्थव्यवस्थेच्या तत्त्वावर सुप्रतिष्ठित अशा भांडवलशाहीच्या प्राथमिक अवस्थेपासून ही किती तरी पुढे झालेली वाटचाल आहे व ती सर्वसामान्यपणे समाजवादाच्याच दिशेने झालेली आहे. किंबहुना लोकशाही भांडवलशाही राष्ट्रांतील सुधारित भांडवलशाही व लोकशाही समाजवादी राष्ट्रांतील समाजवाद ही उत्तरोत्तर एकमेकांच्या अधिकाधिक जवळ येत आहेत असा निष्कर्षही काही निरीक्षक काढतात.

ही जवळ येण्याची प्रक्रिया संपूर्ण मीलनापर्यंत होईल अशी अपेक्षा मात्र राखता येणार नाही. अर्थव्यवस्थेचे सर्व निर्णय कोणत्याही खाजगी व्यक्तीच्या हिताच्या दृष्टीने घेतले जाण्याऐवजी सर्व समाजाच्या हिताचा विचार करून घेतले जातील व श्रमाला प्रोत्साहन म्हणूनच केवळ आवश्यक असलेल्या आर्थिक विषमतेपलीकडील आर्थिक विषमता सहन केली जाणार नाही, हा लोकशाही समाजवादाचा आग्रह असला पाहिजे. सुधारित भांडवलशाही आपल्या पावलांनी या मर्यादेपर्यंत येईल असे वाटत नाही.

हे दोन्ही आग्रह कमी करून लोकशाही समाजवाद सुधारित भांडवलशाहीशी तडजोड करील काय? अशी तडजोड तो आजही करीत आहे असा आग्रही समाजवाद्यांचा लोकशाही समाजवादावर आरोप आहे. इंग्लंडमधील लोकशाही समाजवादी मजूर सरकार भांडवलशाहीवर नियंत्रण ठेवण्यात यशस्वी होण्याऐवजी भांडवलशाहीच त्या सरकारला आपल्या पचनी पाडीत आहे, असा इंग्लंडमधील नूतन डाव्या गटाचा (The

New Left) त्या सरकारवर आरोप आहे. केवळ सुधारणावादी जुजबी कार्यक्रमावर आत्मसंतुष्ट न राहता त्या सरकारने अधिक प्रभावी कार्यक्रम हाती घेतला पाहिजे व लोकमताच्या दडपणाने त्या सरकारला तसे करणे भाग पाडले पाहिजे असा या गटाचा आग्रह आहे.

नवमार्क्सवादी (neo-Marxists) म्हणतील, 'आम्ही तरी वेगळे काय सांगत होतो? सुधारित भांडवलशाही कितीही सुधारित झाली तरी तिचे मूळ स्वरूप बदलत नाही व मार्क्सवादात कितीही उणिवा आढळल्या तरी त्याची मूलभूत प्रमेये ही अबाधितच राहतात. दलितांची स्थिती तुम्हाला खरोखर मनापासून सुधारावयाची असेल, तर हे सत्य तुम्हाला नजरेआड करता येणार नाही.'

हे खरे आहे का?

●●●

या प्रश्नाचा खरा निकडीचा विचार लोकशाही मार्गाने समाजवादी समाजरचनेकडे जाऊ पाहणाऱ्या अप्रगत व अर्ध-प्रगत राष्ट्रांनी केला पाहिजे. याविषयीचे सर्व तत्त्वमंथन व यासंबंधीचा साम्यवादी राष्ट्रांतील व प्रगत भांडवलशाही राष्ट्रांतील अनुभव लक्षात घेऊन आपल्याला अभिप्रेत असणाऱ्या समाजवादाचा आशय त्यांनी सुनिश्चित केला पाहिजे. परिस्थिती ही नेहमी गतिमान असते व बदलत्या परिस्थितीत या आशयात काही फरक पडणारच नाही, असा आग्रह धरण्याचे कारण नाही. परंतु सद्यःस्थितीत आपल्याला इष्ट असलेल्या समाजवादाचा आशय काही सूत्रांत मांडता येईल असे मला वाटते.

ती सूत्रे अशी -

(१) व्यक्तिस्वातंत्र्याचा पाया असलेली लोकशाही अबाधित राखून समाजवादी समाजरचना आपल्याला साध्य करावयाची आहे.

(२) अशा पद्धतीच्या लोकशाहीवर ज्यांचा विश्वास नाही व संसदीय लोकशाही हे केवळ आपली अंतिम हुकूमशाही स्थापन करण्याचे साधन एवढ्याच दृष्टीने संसदीय लोकशाही जे वापरू पाहतात, त्या पक्षांना राजकीय अधिकारावर येऊ देण्यात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष आपली काही मदत होणार नाही याची दक्षता घेतली पाहिजे.

(३) लोकशाही समाजवादी पक्षाने निवडणुकीचा निर्णय आपल्या विरूद्ध जाईल, तेव्हा अधिकारपद सोडण्याची सदैव तयारी राखली पाहिजे.

(४) संसदीय लोकशाही हा अंतिम क्रांतीच्या मार्गावरचा केवळ एक टप्पा या दृष्टीने त्याच्याकडे पाहता कामा नये. अगदी अंतिम टप्प्याच्या वेळी हिंसाचार अटळ आहे, ही भूमिका मनापासून नाकरली पाहिजे.

(५) परंतु केवळ संसदीय लोकशाही क्रांतिकार्य पुरे करू शकणार नाही, ही तिची मर्यादा आपण ओळखली पाहिजे. एकतर हितसंबंधी गटांचा दबाव तिला पुरेसे क्रांतिकारक कार्य करू देणार नाही. शिवाय जनमत पुरेसे जागृत नसेल तर केवळ कायदे करून परिस्थितीत बदल पडत नाही हा आपला अनुभव आहे.

(६) जनमत जागृत व संघटित करणे व आपल्या न्याय्य हक्कांसाठी अहिंसक लढ्याला - सत्याग्रहाला - सिद्ध असण्याचे जनतेला शिक्षण देणे हा लोकशाही समाजवादी क्रान्तीचा भारतात सर्वात प्रमुख मार्ग आहे. हा गांधीजींचा विसरलेला वारसा आपण नीट जतन केला पाहिजे व वाढविला पाहिजे. सर्वोदयवादी लोकांनी प्रतिकारात्मक आंदोलने कटाक्षाने टाळली व समाजवादी लोकांनीही प्रभावी आंदोलने गेल्या वीस वर्षांच्या काळात उभी केली नाहीत, हे भारतातील लोकशाही समाजवादाच्या आजच्या दुर्बलतेचे सर्वात महत्त्वाचे कारण आहे.

(७) राजकीय सत्तेचे विकेंद्रीकरण प्रत्यक्षपणे परिणामकारी होईल याची दक्षता घेतली जाणे आवश्यक आहे.

(८) आर्थिक नियोजन हा आपल्या अर्थव्यवस्थेचा अटळ असा भाग आहे. आर्थिक नियोजन हा हुकूमशाहीतून गुलामगिरीकडे नेणारा मार्ग आहे, या आर्थिक नियोजनावरील तात्त्विक आक्षेपाला, तात्त्विक पातळीवर अजून संपूर्णतया समर्पक असे उत्तर दिले गेले आहे असे म्हणता येणार नाही. कदाचित ते कधीच दिले जाणार नाही. परंतु विशिष्ट ध्येयाची आच असेल तर तात्त्विकदृष्ट्या न सुटणाऱ्या कोड्यांची उत्तरे सुजाण जागरूक व्यवहारात मिळू शकतात. भारतातील समाजवादी नियोजनाने आग्रहपूर्वक हे उत्तर व्यावहारिक कर्तृत्वाच्या क्षेत्रात शोधले पाहिजे.

(९) एक अपरिवर्तनीय तत्त्व म्हणून राष्ट्रीयीकरणाचा आग्रह धरण्याचे कारण नाही. परंतु अखिल अर्थव्यवस्थेवर नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने उपयुक्त अशा व्यवसाय-उद्योगांचे राष्ट्रीयीकरण आवश्यकच आहे. कार्यक्षमतेवर राष्ट्रीयीकरणाचा विपरीत परिणाम होणार नाही याची दक्षता मात्र घेतली गेली पाहिजे.

(१०) मिश्रअर्थव्यवस्था हे भारताच्या अर्थव्यवस्थेचे दीर्घकालीन किंवा चिरकालीन स्वरूप राहणार आहे. खाजगी अर्थक्षेत्राला पुरेसे प्रोत्साहन राहील, परंतु भारताच्या अर्थ-








कारणावर किंवा राजकारणावर ते अर्थक्षेत्र विपरीत प्रभाव टाकू शकणार नाही हे पाहिले पाहिजे.

(११) आपल्या विशेष प्रश्नांचा विचार करून आपल्या अर्थव्यवस्थेची रचना केली पाहिजे. या रचनेत उत्पादनाचे विकेंद्रीकरण व लघुउद्योग यांना महत्त्वाचे स्थान आहे, हे ओळखून त्या दृष्टीने प्रगती करावयाची तर प्रत्यक्ष काय उपाययोजना केली गेली पाहिजे, याचा विचार होणे आवश्यक आहे.

(१२) अर्थसंकल्पातील करादान व वित्तविनियोग या व इतर मार्गांनी आर्थिक विषमतेतील अंतर द्रुतगतीने कमी केले पाहिजे. जनतेच्या डोळ्यात सलेल अशा ऐशारामी उपभोगाला (conspicuous consumption) पूर्णपणे बंदी घातली गेली पाहिजे. अन्न, वस्त्र, निवारा, औषधपाणी व शिक्षण यांची एक किमान पातळी सर्वांना उपलब्ध होईपर्यंत तर हा आग्रह कटाक्षाने राखला पाहिजे.

(१३) शेतीच्या क्षेत्रांत उत्पादनवाढीच्या तंत्राचा प्रश्न आहे, त्याप्रमाणे संघटनेचाही प्रश्न आहे. सामूहिक शेती हा लोकशाहीला पोषक असा मार्ग होऊ शकत नाही. सहकारी शेतीचा एक पर्याय उपलब्ध आहे. ग्रामदानी गावांतूनही या दिशेने कार्य होण्याची शक्यता आहे. या दोन्ही पद्धतींनी आज प्रत्यक्षात झालेले काम केवळ नाममात्र आहे. या दोन्ही क्षेत्रांत प्रभावी कार्यक्रमाची चालना समाजवादी विचाराच्या मंडळींनी देण्याची आवश्यकता आहे. नाहीतर निदान या कार्यक्रमाच्या मर्यादा पारखून घेऊन नवे मार्ग शोधले पाहिजेत.

(१४) भारताच्या विशेष परिस्थितीत केवळ आर्थिक कार्यक्रमावर विसंबून न राहता सामाजिक समतेचा कार्यक्रम हा समाजवादाचे एक महत्त्वाचे अंग समजून पुढे नेला पाहिजे.

(१५) सर्व नैतिक प्रेरणा या संकुचित गटापुरत्या मर्यादित नसून सर्व मानवतेला स्पर्श करणाऱ्या अशा असतात. परंतु मानवांचा स्वार्थ त्यांना एखाद्या गटापुरता किंवा राष्ट्रापुरता राबवणारच नाही असे नाही. म्हणूनच आपल्या स्वातंत्र्याचे प्राणापलीकडे जतन करणारे राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राच्या स्वातंत्र्याचा अपहार बिनदिक्कतपणे करू शकते. म्हणूनच प्राचीन ग्रीसमधील लोकशाही गुलामांना शासनव्यवस्थेत कोणतेही अधिकार न देता नांदू शकली. भांडवलशाही राष्ट्रांना आर्थिक शोषणासाठी इतर राष्ट्रांवर साम्राज्यशाही लादावी लागते तशी समाजवादी राष्ट्रांना लागणार नाही, अशी मार्क्सवादाची अपेक्षा आहे. किंबहुना साम्यवादात राष्ट्र या कल्पनेचे महत्त्व हे दुय्यमच राहील किंवा नाहीसे होईल व जगातील सारा मजूरवर्ग जगातील साऱ्या भांडवलदारांविरूद्ध एकजूटीने उभा राहील अशी त्याची अपेक्षा होती. तशी त्याची स्पष्ट हाकही होती. आजपर्यंत तरी आंतरराष्ट्रीय एकत्त्वाच्या या भावनेपेक्षा राष्ट्रवादी निष्ठेचे आवाहन प्रबळ ठरत असलेले दिसून आले आहे; आणि लष्करी सामर्थ्यांच्या वळावर दुसऱ्या राष्ट्राला त्याच्या इच्छेविरूद्ध आपल्या धोरणाप्रमाणे वागावयास लावणे हा जर साम्राज्यशाहीचा मुख्य आशय मानला, तर साम्यवादी राष्ट्रांनाही साम्राज्यशाही आचरणाच्या आरोपातून मुक्त करता येणार नाही.

या मानवी प्रवृत्तीचे भान राखून समाजवादी भारताने आपले अंतर्गत व आंतरराष्ट्रीय धोरण आखले पाहिजे. हिंदू समाजवाद, द्रविड समाजवाद यांसारख्या कल्पनांचा नुसता उपहास करून चालणार नाही. त्यांना अधिक समर्थ विरोध केला पाहिजे. त्याप्रमाणे आंतरराष्ट्रीय समाजवादाच्या नावाखाली एखाद्या साम्यवादी राष्ट्राचे आपल्यावर आक्रमण होणार नाही याचीही दक्षता घेतली पाहिजे.

(१६) रूढ धर्मातील मर्यादा व त्यापासून निर्माण होणारे धोके समाजवाद ओळखत असल्यामुळे, प्राथमिक पायरी म्हणून धर्मातीत भूमिका व नंतर रूढ धर्मकल्पनेचा निरास या पद्धतीचा समाजवादी समाजरचनेचा व्यवहार सहजपणे होऊ शकेल. परंतु धर्मकल्पनेला विरोध, म्हणून अध्यात्मवृत्तीला विरोध व त्याचाच परिपाक म्हणून सर्व मानवी जीवनाची केवळ भौतिक पायावर आधारित अशी मीमांसा, असा हट्टाग्रह समाजवादाने धरावयाचे कारण नाही. भौतिक पायाचे महत्त्व हे आहेच, परंतु त्या पायावरील मंगल मानवी संस्कृतीच्या उभारणीत केवळ भौतिकतेने ज्यांचा उलगडा होत नाही अशा अनेक मानवी मनाच्या प्रेरणा कार्यकारी होत असतात. केवळ आर्थिक समृद्धीने भौतिक प्रश्न मिटतात, परंतु मानवी जीवन निश्चितपणे सुखी होतेच असे नाही. अमेरिकेसारख्या सर्वात समृद्ध राष्ट्रातही त्याची जाणीव होऊ लागली आहे. म्हणूनच या वर्षीच्या अमेरिकन काँग्रेसपुढे केलेल्या आपल्या वार्षिक महत्त्वाच्या भाषणात 'समृद्धी आणि सुख या गोष्टी एक नाहीत हे अमेरिकेने ओळखण्याची गरज निर्माण झालेली आहे' हा विचार प्रेसिडेंट निक्सन यांनी आग्रहाने मांडला. साम्यवादी रशियातील अनुभव तर याहूनही विपरीत आहे, याची जाणीव सर्वांना आहे. समाजवादाच्या मार्गाने समृद्धीकडे व समतेकडे जात असताना व रूढ धर्मकल्पनांचा निरास करीत असताना, प्राचीन परंपरेतून लाभलेल्या सर्व धर्मातील मानवी मूल्यांचा परिपोष करून ती आत्मसात करण्याची सावधानता भारतीय समाजवादाने आपल्या आशयात कटाक्षाने बाळगली पाहिजे.

'समाजवादाचा आशय' या विषयावर आजवर तत्त्वचिंतनात किंवा व्यावहारिक कार्यक्रमात कुठेही एकमत

झालेले आहे असे आढळून येणार नाही. वाटल्यास हेच त्या विचारप्रणालीच्या जिवंतपणाचे व परिस्थितीच्या देशकाल सापेक्षतेचे गमक मानता येईल. प्रत्येकाचा पाहण्याचा दृष्टिकोन हा देखील या दर्शनात महत्त्वाचा आहे. काही एका ठराविक मर्यादेनंतर वादविवादाने देखील या गोष्टींचा निर्णय होऊ शकत नाही. 'यो यत् श्रद्धः स एव सः' हीच भूमिका शेवटी स्वीकारावी लागते.

याविषयीची माझी आजची श्रद्धा ही अशी आहे.

('समाजवाद : प्रेरणा व प्रक्रिया' या ग्रंथातून साभार.)

✠ ✠ ✠

तीन तपांपूर्वीची माझी ही धारणा आजही तशीच आहे.

परंतु अजूनही मला ती कठोरपणे तपासून घ्यावयास आवडेल.

- देवदत्त दाभोलकर

✠ ✠

# समाजवाद

समाजवादी आंदोलन अपेक्षेप्रमाणे का यशस्वी झाले नाही याची कारणमीमांसा असेमनी केली आहे. ते सांगतात : (पृ० ३२०-३२३, मी एस० एम०)

"तात्पर्य काय तर आमच्या अपयशाचे कारण आमचे नेतृत्व अपुरे पडले हे आहे. डॉ. लोहियांना खूप दूरचे पाहण्याची शक्ती होती. पर्यायी विरोधी पक्ष उभा करायचा तर जनसंघाबरोबर समझोता केला पाहिजे ही त्यांची भूमिका चुकीची नव्हती. पण अवेळी फार लौकर त्यांनी ती घेतली होती. मी डॉक्टरांना म्हटले होते की न पचेल असे अन्न लोकांना घालू नका. पण डॉक्टरांचा स्वभाव आग्रही, 'ॲसर्टिव्ह'. ते संसोपाचे सभासद व्हावेत असा माझा आग्रह होता. पण ते झाले नाहीत. गांधीजींप्रमाणे पक्षाबाहेर राहून नेतृत्व करु लागले. पण गांधीजींची शक्ती त्यांच्यामध्ये नव्हती.

"जयप्रकाशजींचे महत्त्व डॉक्टरांना मान्य होते. काय करावयास पाहिजे हे मला समजते पण जनतेला हलविण्याचे सामर्थ्य जयप्रकाश फक्त तुझ्यात आहे, असे ते माझ्या समक्ष जेपींना अनेकदा म्हणत.

"जयप्रकाशजींचे चुकले ते एवढेच की भावनाप्रधान होवून त्यांनी जीवनदान देण्याची जरुरी नव्हती. पक्षाला बरोबर घेवून त्या कामात त्यांनी उतरावयास हवे होते.

"चांगली चांगली नेते मंडळी अकाली निधन पावली ही बाबही आमच्या अपयशाची मीमांसा करताना विचारात घ्यावी लागेल. आचार्य नरेन्द्र देवांना अस्थम्याने अकाली उचलले आणि डॉ. लोहियाही खऱ्या नेतृत्वाचे गुण अंगी बाणायला लागले होते तोच गेले."

यानंतर असेम सांगतात :

"आम्ही आजवर जे जे केले ते ते सर्व चुकीचे होते असे मला मुळीच म्हणावयाचे नाही. लोकशांही आपण मान्य केली आहे तर पर्यायी पक्ष हवाच. एकपक्षीय लोकशाही असूच शकत नाही. तसे म्हणणे म्हणजे वदतो व्याघात होय. म्हणून पर्यायी पक्ष उभा करण्याची आपली धडपड ही लोकशाही समाजवादाच्या दिशेने झालेली वाटचालच होय. या संसदीय निवडणुका जिंकून प्रभावी पर्यायी पक्ष उभा करण्याच्या प्रक्रियेत समाजवाद्यांनी जो डॉ. आंबेडकरांच्या बरोबर समझोता केला हे समाजवाद्यांचे योग्य दिशेने पडलेले पहिले पाऊल होते. ते पाऊल आपण मागे घ्यायला नको होते. कारण लोकशाही आणि समाजवाद यांची खरी आवश्यकता अनुसूचित जाती जमाती आणि बाकीचे मागास समाज यांनाच आहे. वरच्या वर्गातल्यांना नाही.

"(ग्रोथ थ्रू कॉन्ट्रॅडिक्शन)· किंवा विरोधातून विकास हे मार्क्सवादाचे सूत्र घेतले तरी आर्थिक व सामाजिक दोन्ही दृष्ट्या खाली असणारा समाज जागृत करुन, त्याला छळणाऱ्या समन्धाच्या विरुद्ध आपण संघर्षासाठी उभा करीत नाही, तोपर्यंत या देशात सामाजिक क्रांती होणार नाही व त्या समाजाची प्रगती होणार नाही. पूर्वी आमचे आणि कम्युनिस्टांचे म्हणणे असे होते की आर्थिक प्रश्न सुटले की सगळे प्रश्न सुटतील. जातिभेद देखील नष्ट होतील. अनुभव वेगळा आला आहे. वर्गीय संघटना उभ्या केल्या तरी पुन्हा त्यात जातीयवाद येतो व त्या संस्था जेवढ्या बलवान व्हावयास पाहिजेत तेवढ्या होत नाहीत. म्हणून समतेचे मूल्य हे प्रथम क्रमांकाचे मूल्य मानले पाहिजे. आणि मला अभिमानपूर्वक नमूद करावेसे वाटते की समाजवाद्यांनी या समता मूल्याची जेवढी जपणूक आणि जोपासना केली तेवढी अन्य कोणत्याही पक्षाने केलेली नाही. समानतेच्या मूल्याचे बियाणे समाजवाद्यांनी जपले ही त्यांची समाजवादी आंदोलनाला फार मोठी देणगी आहे असे माझे प्रांजल मत आहे.

"काँग्रेसने स्वतःला समाजवादी म्हणवून घेण्यास सुरुवात केली ती कोणामुळे? स्वातंत्र्यपूर्वकाळापासून समाजवाद्यांचे वेगळे आंदोलन नसते तर हे झाले असते काय? किंवा आता भारतीय जनता पक्षही स्वतःला गांधीवादी समाजवादी म्हणवू लागला आहे. म्हणजे समानतेचे मूल्य त्या पक्षानेही स्वीकारले आहे. समाजवाद्यांनी हा विचार जास्तीत जास्त व प्रथमपासून सांगितला म्हणूनच हे बदल घडले आहेत ना?

"आर्थिक व सामाजिक विषमता हाच समाजवादी आंदोलनाचा, जनता शक्ती संघटनाचा पाया होऊ शकतो; दुसरा होऊ शकत नाही. त्यासाठी निरनिराळ्या आघाड्यांवर लढावे लागेल. शिवाय विरोधी पक्ष पाहिजे म्हटल्यावर आपलाच एकटा पक्ष विरोधी अथवा पर्यायी बनेल असे म्हणून चालणार नाही. परस्परांशी जुळवून घेऊनच तो उभा राहू शकेल व दरम्यान अनेकदा पराभव खाण्याची पाळी येईल.

"व्यक्तिगत नैतिक आचरणाच्या दृष्टीने फार मोठे आदर्श जयप्रकाशजींनी घालून दिले. हे आदर्श समाजवाद मानतो.

"आपले शक्तिस्थान कोणते? आर्थिक व सामाजिक दृष्ट्या पीडित असणाऱ्यांना त्यांच्या पायावर उभे करणे हे शक्तीचे उगमस्थान आहे. आता त्यासाठी मागासवर्गीयांना संघटित करण्याचे खरे काम व्हावयास हवे."

संकलन - देवदत्त दाभोलकर








# एकविसाव्या शतकातील समाजवाद

बगाराम तुळपुळे

(लेखांक : १)

सुमारे दीडशे वर्षांपूर्वी कार्ल मार्क्सने आपला (Communist Manifesto) 'साम्यवादाचा जाहीरनामा' हा सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला. त्यात त्याने एक वर्गविहीन, शोषणविरहित, समतेवर आधारित समाजरचना कशी होऊ शकेल हे दाखविले होते. आणि तसे होण्यासाठी पायरी-पायरीने शक्ती कशी कमवावी याचे विवेचन केले होते. इतरही अनेकजण वेगवेगळ्या देशात असा विचार करीत होते. शोषण करण्यामागील दुष्ट प्रवृत्ती आणि माणसाने माणसावर केलेली जुलुम-जबरदस्ती कशी नाहीशी करता येईल याचा विचार करीत होते. अर्थात, त्या सर्वांचा कार्ल मार्क्सच्या विचारावर पूर्णतः विश्वास नव्हता. साध्य मिळवण्यासाठी जी साधने वापरावयाची, जी ध्येय-धोरणे ठरवावयाची याविषयी त्यांच्यात एकवाक्यता नव्हती. असे असले तरीही, त्या सर्वांची मूलभूत प्रेरणा समाजवादाच्या ढाच्याशी सहमत होती.

कार्ल मार्क्सनंतरच्या शतकात, समाजवादाची ही विचारधारा अधिकाधिक रुंदावत व शक्तिशाली होत गेली. काही देशात ती हिंसक पद्धतीने साध्य करण्याचा प्रयत्न झाला. तर इतर काही देशात ती लोकशाही पद्धतीने साध्य करण्याचा प्रयत्न झाला. विसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या पन्नास वर्षात जगात प्रचंड उलथापालथ घडून आली. सर्वप्रथम, रशियात झारशाहीचा नायनाट करून राज्याची स्थापना करण्यात आली. या नव्या राष्ट्राचे 'सोव्हिएत समाजवादी प्रजासत्ताक' (USSR) असे नामकरण करण्यात आले.

या क्रांतीचा सर्वदूर जोरदार प्रभाव जगभर पडला आणि नंतरची जवळजवळ पाऊणशे वर्षे हा प्रभाव दाखवीत राहिली. एवढ्या मोठ्या प्रभावाचा परिणाम, काही प्रमाणात तरी ब्रिटनमध्ये पडला आणि तेथे 'लेबर पार्टी' ची स्थापना झाली. ब्रिटनचे अनुकरण करून पश्चिम युरोपातील इतर देशातही विचारांत व युक्तीवादात फरक पडू लागला. रशियातील नव्याने स्थापन झालेल्या सोव्हिएट समाजवादी प्रजासत्ताकाने आपल्या 'कॉमिन्टर्न' व नंतर 'कॉमिन्फॉर्न' या नव्याने स्थापन केलेल्या संस्थांमार्फत इतर राष्ट्रांतही कम्युनिस्ट पार्टीची स्थापना करण्यात पुढाकार घेतला. असे प्रयत्न त्यांनी जगामधील सर्व देशांत सुरू केले.

या निरनिराळ्या देशांतील स्थापन केलेल्या कम्युनिस्ट पार्टींनी कामगारांच्या संघटना बांधण्यास सुरुवात केली आणि त्यात काही प्रमाणात त्या यशस्वीही झाल्या. या निरनिराळ्या देशांतील संघटनांनी प्रयत्नपूर्वक भांडवलशाही विरोधी आणि जमीनदारी विरोधी जोरदार लढा देण्यास सुरुवात केली. परंतु या पक्षांची ध्येय व धोरणे तसेच काम करण्याची पद्धती व मोर्चे बांधणी सोव्हिएट रशियाच्या मार्गदर्शनाखाली होत होती. याउलट इतर समाजवादी विचारसरणी तत्वतः व धोरणांतही कम्युनिस्ट पक्षांच्या छताखाली येण्याचे नाकारत होत्या. असे असले तरीही, त्यांची डावीकडे झुकणारी विचारसरणी जगभर एकच होती.

विसाव्या शतकाच्या पहिल्या उत्तरार्धात, या जगात दोन प्रचंड मोठी जागतिक युद्धे झाली. ही दोन्ही युद्धे भांडवलशाही देशात सुरू झाली. या युद्धांच्या मुळाशी त्या देशांतील आर्थिक आणि साम्राज्यवादी शक्ती होत्या. या युद्धांत एक महत्त्वाची गोष्ट दिसून आली. ती म्हणजे कार्ल मार्क्सची भांडवलशाहीविषयी जी भाकिते (prognosis) होती, ती खिळखिळी होऊ लागली.

दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी, युद्ध अर्ध्यावर आल्यानंतर सोव्हिएट रशियाला त्यात भाग घेणे अपरिहार्य झाले. त्यावेळी, सोव्हिएट रशियाची कार्यक्षमता आणि सैन्याचे मनोबल दिसून आले. आणि रशियातील जर्मनीच्या नाझींचे होणारे आक्रमण थोपविण्यास आणि नाझींचा बिमोड करण्यात ते महत्त्वाचे ठरले. थेट जर्मनीची राजधानी बर्लिनमध्ये जाऊन रशियन सैन्याची आपली सत्ता प्रस्थापित केली. याचा परिणाम असा झाला की, भांडवलशाही देशांचा स्वतःविषयीचा आत्मविश्वास डळमळू लागला.

दुसरे महायुद्ध चालू असतानाच, ब्रिटन व इतर साम्राज्यवादी राष्ट्रांतील वसाहती साम्राज्यवादाचा जू आपल्या

मानेवरून काढून टाकण्याचे प्रयत्न करू लागल्या. दुसरे महायुद्ध जर्मनी व इटली या राष्ट्रांचा पूर्ण पराभव करून समाप्त झाले. त्यामुळे उत्साहित होऊन विजयी राष्ट्रातील वसाहती आपले स्वातंत्र्य मिळवण्यासाठी अधिकाधिक जोर धरू लागल्या. नंतरच्या काही वर्षात हे स्वातंत्र्य आफ्रिका, दक्षिण अमेरिका वगैरेतील वसाहतींना मिळाले. परंतु भारताने या लढ्यात प्रथम क्रमांक मिळवला व जगभरच्या इतर देशांना आदर्श घालून देण्याचा प्रयत्न केला.

दुसऱ्या महायुद्धानंतरची सर्वात मोठी, आणि जग हादरवून टाकणारी घटना म्हणजे चीनमधील माओत्सेतुंगच्या नेतृत्वाखाली चीनमधील कम्युनिस्ट (साम्यवादी) पक्षाने केलेला, त्या देशातील भांडवलशाही (कोमांग् टांग) राजवटीचा पराभव. या राजवटीला संपूर्ण चीनबाहेर हाकलून देऊन 'तैवान' या छोट्या बेटावर स्थलांतर करावयास भाग पाडले.

दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस ब्रिटनमधील भांडवलशाहीवादी (Conservative party) पक्षाचा निवडणुकीत पराभव करून कामगार पक्षाचा (Labour party) झालेला जय ही एक महत्त्वाची घटना ठरली. या पक्षाने ब्रिटनमधील पायाभूत उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरण (Nationalisation) केले आणि नागरिकांसाठी 'सामाजिक सुरक्षा यांजना' सुरू केली. या योजनेअंतर्गत ब्रिटनमधील प्रत्येक नागरिकाला जन्मापासून ते मृत्यूपर्यंत संरक्षण देण्यात येते. पश्चिम युरोपातही लोकशाही समाजवादी पक्ष मजबूत होऊ लागले आणि पश्चिन जर्मनीत लोकशाही समाजवादी पक्ष सत्तेवर आला. (पूर्व जर्मनीत मात्र सोव्हिएट रशियाचे वर्चस्व होते आणि तेथे सामान्य नागरिकांच्या हक्कांचा खूपच संकोच होता).

याच कालखंडात जगभर सर्वत्र कारखान्यांतील कामगार संघटना बांधू लागले. यांपैकी बऱ्याचशा संघटना साम्यवादाकडे झुकणाऱ्या होत्या, तर काही समाजवादाच्या बाजूच्या होत्या. ज्या ज्या देशांत साम्यवादी वर्चस्व होते त्या त्या देशांतही कामगार संघटना होत्याच, परंतु त्या पूर्णपणे सरकारच्या दडपणाखाली दबलेल्या होत्या. जगात इतरत्र या कामगार संघटना बऱ्याच मोठ्या प्रमाणात साम्यवादाकडे झुकलेल्या असल्यामुळे, सोव्हिएट रशियातील कॉमिन्टन / कॉमिन्फॉर्म यांनी आखून दिलेल्या आराखड्यानुसार कार्यरत होत्या. परंतु तरीही, त्यांनी कामगारांचे प्रश्न लावून धरण्यात पुढाकार घेतला. त्यामुळे साम्यवादी/समाजवादी संघटनांना बळ मिळत गेले.

अर्थात, यामुळे भांडवशाही विचारसरणीला या संघटना नाऊमेद करू शकल्या नाहीत. दुसऱ्या महायुद्धानंतर पश्चिम युरोपातील जवळजवळ सर्व कारखाने वेचिराख झाले होते. त्यामुळे या राष्ट्रांची पुनर्बांधणी करण्यासाठी कारखाने पुन्हा सुरू करणे अत्यावश्यक होते. या कारखान्यांपैकी जवळजवळ सर्व कारखाने खाजगी मालकीचे होते. याच काळात अमेरिकेने जपान या शत्रूराष्ट्राचा पूर्णपणे पराभव करून तेथे आपली सत्ता प्रस्थापित केली होती. अमेरिकेने तेथे खाजगी उद्योगधंद्यांना उत्तेजन दिले आणि जपानची अर्थव्यवस्था पूर्णपणे खाजगी स्वरूपाची झाली. या सगळ्याचा परिणाम असा झाला की, ज्या ज्या देशांत साम्यवादी विचारसरणी प्रबळ नव्हती, त्या त्या देशात भांडवलशाही विचारसरणी रुजू लागली. एवढेच नव्हे, तर या विचारसरणीचा प्रभाव सर्वदूर पसरला.

परिस्थिती अशी असली तरीही, आणि साम्यवादाच्या प्रभावाखाली असणारी राष्ट्रे, त्याचप्रमाणे समाजवादी विचारसरणीचा पाठपुरावा करणारी राष्ट्रे इतरत्र असली तरीही समाजवादी विचारसरणीचा प्रभाव जगभर जाणवत होता. अशी परिस्थिती गेल्या शतकाच्या (२० व्या) पूर्वार्धात होती. परिणामतः भारतीय समाजवादाची तात्त्विक मांडणी करणारा समाजवादी नेता, अशोक मेहता याने खालील महत्त्वाचे विधान केले, ते म्हणजे - 'आतापर्यंत जरी भांडवलशाही विचारसरणीची सरशी होत असताना दिसली तरी १९५० नंतरच्या कालखंडात समाजवादाची सरशी होणार आहे.' काही प्रमाणात हे विधान आपल्या सहकाऱ्यांना व कार्यकर्त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी होते हे खरे, पण काही प्रमाणात ते त्यांच्या आशावादावर आणि अपेक्षांवर अवलंबून होते.

भारतात समाजवादी पक्षाचा जन्म १९३५ च्या सुमारास झाला. या पक्षातील बहुसंख्य सभासद तरुण होते आणि ते 'अखिल भारतीय काँग्रेस' पक्षावरोवर सहकार्य करून लढ्यात भाग घेत होते. साम्यवादी पक्ष मात्र भारतात आधीच प्रस्थापित झाला होता. काही काळ असे वाटत होते की हे दोन्ही पक्ष खांद्यास खांदा लावून काम करतील, जरी ते एकमेकांत विलीन होऊ शकले नाहीत. परंतु प्रत्यक्षात हे घडले नाही. कारण या दोन्ही पक्षांत तात्त्विक फरक मोठा होता आणि






त्यांची धोरणेही समान नव्हती. समाजवादी पक्षातील कार्यकर्ते काँग्रेसने वेळोवेळी चालविलेल्या स्वातंत्र्य लढ्यात मनापासून सामील झाले. याउलट साम्यवादी पक्ष जरी 'आम्ही पूर्ण स्वातंत्र्य मिळवण्यासठी प्रयत्नशील आहोत' असे म्हणत असला तरी सोव्हिएट रशियाच्या प्रभावाखाली असलेल्या विचारसरणीशी बांधील राहिला.

१९४२ च्या ऑगस्ट महिन्यात महात्मा गांधींनी ब्रिटिश राज्याविरुद्ध 'चलेजाव' चळवळ सुरू केली. या चळवळीत देशातील असंख्य तरुण आणि तरुणी सामील झाले. या चळवळीच्या सुरुवातीच्या काळातच काँग्रेसचे बहुतेक सर्व पुढारी, एवढेच नव्हे, तर जिल्हा व तालुक्यातील काँग्रेस कार्यकर्ते तुरुंगात डांबले गेले. या काळात ब्रिटिश सरकारच्या विरोधात असणारे समाजवादी पुढारी व कार्यकर्ते भूमीगत झाले आणि त्यांनी गुप्तपणे ही चळवळ चालू ठेवली. त्यांना बहुसंख्य जनतेची मदत होती. परंतु हळूहळू एकेक जण पकडले गेले आणि तुरुंगात डांबले गेले. त्यापैकी बरेचजण १९४४-४५ च्या कालखंडात तुरुंगातून सुटका होऊन बाहेर आले. तुरुंगात त्यांच्या समाजवादी पक्षाच्या पुढाऱ्यांशी ओळखी झाल्या आणि त्यांच्या प्रभावाखाली व त्यांचे समाजवादाचा पुरस्कार करणारे वाङ्मय वाचून, ते समाजवादी पक्षाचे सभासद, किंवा पुरस्कर्ते झाले.

सन १९४५ च्या अखेरीस काँग्रेसचे व समाजवादी पक्षाचे पुढारी व कार्यकर्ते तुरुंगातून सुटून आले. त्यापैकी समाजवादी विचारसरणीशी बांधिलकी असणाऱ्यांपैकी जयप्रकाश नारायण, राममनोहर लोहिया, अच्युत पटवर्धन, अरुणा असफअली आणि इतर काहीजण भारतातील घराघरातून माहीत झाले. त्यांनी ताबडतोब काँग्रेस समाजवादी पक्ष असे दोन्ही प्रमुख पक्षांचे एकत्रीकरण केले. त्यांच्या पाठीशी असंख्य तरुण कार्यकर्ते उभे राहिले. या नवीन पक्षांतर्गत अनेक गंभीर व दीर्घकाळ चालणारी चर्चासत्रे झाली. त्यात समाजवादाची मूलभूत तत्त्वे आणि समाजवादी पक्षाची ध्येय व धोरणे ठरविण्यात आली. संघटना बांधणीचे कामही मोठ्या प्रमाणात हाती घेण्यात आले. हा नवीन पक्ष एका बाबतीत आग्रही होता - समाजवाद लोकशाहीवर आधारीत पाहिजे, आणि खरीखुरी लोकशाही समाजवादी विचारसरणीशी बांधील असली पाहिजे. कामगारांच्या हुकुमशाहीचे मार्क्सवादी व लेनिनवादी जे प्रतिपादन होते ते त्यांनी पूर्णतः अमान्य केले.

याचे प्रमुख कारण सोव्हिएट रशियातील 'कामगारांची हुकुमशाही' म्हणजे प्रत्यक्षात सम्यवादी पार्टीची हुकुमशाही राहिली, एवढेच नव्हे, तर ती एका व्यक्तीच्या ठिकाणी केंद्रित झाली. तो हुकुमशहा करेल ती पूर्वदिशा अशी परिस्थिती तेथे निर्माण झाली.

गेल्या शतकाच्या मध्यावधीत समाजवादी पक्ष केवळ भारतातच प्रभाव दाखवू लागला होता असे नव्हे, तर तो जगातील इतर देशातही प्रभावशाली होत होता. जगात सर्वत्र अशी भावना निर्माण होत होती की, त्या भावनेच्या प्रभावाखाली भांडवलशाही दबून राहिली होती आणि समाजवाद प्रबळ होणार अशी चिन्हे दिसू लागली होती.

परंतु १९५० नंतरचा कालखंड वेगळेच स्वरूप घेऊन आला. १९७० पर्यंत विजयी झालेल्या पश्चिमी देशांत कारखान्यांची व उद्योगधंद्यांची प्रचंड प्रमाणात वाढ झाली आणि भांडवलशाही विचारसरणी प्रभावी ठरू लागली.

ही भांडवलशाही विचारसरणी हळूहळू, नुकत्याच स्वतंत्र झालेल्या पूर्वीच्या वसाहती देशांत पसरू लागली. आंतरराष्ट्रीय दळणवळण वाढू लागले. त्याबरोबर आंतरराष्ट्र उद्योगसंस्था (Multinational Corporations) जागतिक व्यापारावर आपला प्रभाव दाखवू लागल्या आणि बऱ्याच मोठ्या प्रमाणात होणारा नफा आपल्या देशात नेऊ लागल्या. त्यामुळे अनेक राष्ट्रांतील राजकीय परिस्थिती बदलू लागली. लोकशाही समाजवादाची विचारधारा आणि ब्रिटनमधील 'लेबर पक्ष' यांचा प्रभाव कमी होऊ लागला. ब्रिटनमध्ये श्रीमती थॅचरचा हुजूर पक्ष, अमेरिकेत रीगन या राष्ट्राध्यक्षांची विचारधारा व ख्रिश्चन डेमोक्रॅटस् या तिन्ही विचारसरणी प्रयत्नपूर्वक उद्योगधंद्यांना उत्तेजन देऊ लागल्या. त्यामुळे राष्ट्रीय संघटनांचे महत्त्व कमी होऊ लागले आणि संघटित कामगार संघटना कमकुवत झाल्या.

याच कालखंडात आंतरराष्ट्रीय पातळीवर एक महत्त्वाची घटना घडली. भांडवलशाहीवादी अमेरिका आणि साम्यवादी सोव्हिएट रशिया यांच्यात युद्धोपयोगी शस्त्रास्त्रे बनविण्याची चढाओढ लागली. शस्त्रास्त्रे तयार करण्यासाठी रशियाला आर्थिक प्रगती थांबविण्यास भाग पाडले. त्यामुळे या राष्ट्रातील आर्थिक प्रगती व कामगारांचे हक्काचे संरक्षण या गोष्टी मागे पडल्या. याउलट अमेरिकेत भांडवलशाही पहिल्यापासूनच प्रस्थापित झाली होती, आणि विशेष म्हणजे,

या निरनिराळ्या प्रकारच्या शस्त्रास्त्रांच्या निर्मितीसाठी युरोपातील इतर राष्ट्रे मदत करण्यास तत्पर होती, विशेषतः पश्चिम युरोपातील राष्ट्रे अमेरिकेस मदत करण्यास उत्सुक होती. विसाव्या शतकाच्या मध्यावधीपर्यंत सोव्हिएट रशियाची शस्त्रास्त्र निर्मिती फार मोठ्या प्रमाणात प्रगती पथावर होती. ती हळूहळू मंदावत गेली. कारण शस्त्रास्त्र निर्मितीसाठी लागणारा खर्च इतर कामगार कल्याणाच्या योजनांना कपात करू लागला. त्यामुळे कामगारांना कमीतकमी सुविधा मिळू लागल्या. परिणामतः सर्व उपभोगाच्या वस्तू कमी मिळू लागल्यामुळे नोकरशाही आणि भ्रष्टाचार हातात हात घालून वाढू लागला. याचा आणखी एक परिणाम असा झाला की, सोव्हिएट रशियाचे साम्यवादी चीनशी संबंध बिघडले. या सर्व परिस्थितीचा शेवट सोव्हिएट रशियाचे विघटन होण्यात झाला. सोव्हिएट रशियाची एकसंघता दुभंगली व त्या राष्ट्राचे तुकडेतुकडे होऊन अनेक स्वतंत्र राष्ट्रे जन्मास आली. परंतु या तुलनेने छोट्याछोट्या राष्ट्रांची गरिबी मात्र हटली नाही. त्यासाठी त्या राष्ट्रांना भांडवलशाही राष्ट्रांची मदत घ्यावी लागली. याचा परिणाम असा झाला की, साम्यवादी चीननेही आपले कडक आर्थिक धोरण सौम्य करून काहीशा उत्साहानेच भांडवलशाहीच्या काही तत्त्वांचा स्वीकार केला. यामुळे, विशेषतः सोव्हिएट रशियाच्या विघटनामुळे जगभर भांडवलशाही तत्त्वांचा प्रभाव वाढला आणि अमेरिकेच्या दबावाखाली इतर राष्ट्रे राहिली.

या सर्व घटनांचा एक प्रमुख परिणाम असा झाला की, अमेरिकेला जगात प्रतिस्पर्धी राहिला नाही. जगभर भांडवलशाही विचारसरणीच प्रभावी ठरणार याबद्दल कुणालाही संशय उरला नाही. एवढेच नव्हे, तर १९८० च्या सुमारास एका अमेरिकन विचारवंताने असं जाहीर करून टाकले की, यापुढे जगाचा इतिहास लिहिण्याची गरजच नाही. परंतु इतिहासानेच हे त्याचे विधान खोटे ठरविले!

भांडवलशाही अर्थातच वेगाने आणि निरनिराळ्या मार्गांनी आपला प्रभाव जगभर दाखवू लागली होती. १९८० च्या पुढील कालखंडात अमेरिकन भांडवलशाही जगातील जवळजवळ सर्व राष्ट्रात आपले हातपाय पसरू लागली. अमेरिका जगातील सर्वात बलिष्ठ आणि श्रीमंत राष्ट्र बनले. तेथील अर्थव्यवस्था खूपच बळकट झाली. त्यामुळे जगातील इतर राष्ट्रांची आर्थिक पिळवणूक करून आणि त्यांमध्ये अधिकाधिक प्रमाणात ढवळाढवळ करून, आपले वरिष्ठ स्थान स्थापन केले. ही पिळवणूक व ढवळाढवळ विशेषतः अविकसित व विकसनशील राष्ट्रांत अमेरिकेनं केली. माहिती तंत्रज्ञान (Information Technology) व विज्ञानातील वाढते शोध यांच्या सहाय्याने सर्वदूर, अनेक राष्ट्रांत आपले जाळे पसरविणे अमेरिकेला शक्य झाले.

याच कालखंडात अमेरिकेच्या हातात दोन नवीन साधने आली. आंतरराष्ट्रीय नाणेनिधी (International Monatary Fund) आणि जागतिक बँक (World Bank) यांची स्थापना अमेरिकेत झाली. या नाणेनिधी जमविण्यात इतर काही राष्ट्रांचा समावेश असला, तरीही अमेरिकेचा हिस्सा यात फार मोठ्या प्रमाणात होता. अमेरिका व पश्चिम युरोपमधील काही राष्ट्रे यांनी मिळून अविकसित व विकसनशील (ज्यांना ते 'तिसरे जग' म्हणतात) देशांना आपल्या दबावाखाली ठेवण्यात यश मिळवले. या तिसऱ्या जगातील राष्ट्रांनी हळूहळू आपल्या अर्थव्यवस्थेचे सुकाणू या दोन साधनांकडे सोपवले. एवढे करून अमेरिका स्वस्थ बसली नाही. एक नवीन, अधिक जाचक साधन, स्वतःला प्रगत म्हणविण्याऱ्या राष्ट्रांनी घडविले, ते म्हणजे - 'जागतिक व्यापार संघटना' होय! आधीच अमेरिकेचे ऋणी असलेले तिसऱ्या जगातील देश या नवीन संघटनेमुळे धोक्यात आलेले आहेत, कारण, ही संघटना तिसऱ्या जगातील कुठल्या देशांतील, कुठले उत्पादन किती भावाने घ्यावयाचे, का घ्यावयाचे नाही, हे ठरविते. कुठलेही उत्पादन नापसंतही करू शकते.

भारताकडे पाहिले तर, विसाव्या शतकाच्या मध्यावधीत, समाजवादी संघटनांचा मुख्य उद्देश कामगारांना संघटित करणं हा होता. कारण कामगार वर्ग मोठ्या प्रमाणात संघटित झाल्यावर देशात समाजवाद रुजविणे शक्य होईल असा त्यांचा विश्वास होता. त्यामुळे कामगार वर्गात ट्रेड युनियन बांधण्याचा मोठ्या प्रमाणात प्रयत्न झाला. अर्थात, देशात समाजवाद आणावयाचा तर, कामगार वर्गाबरोबर शेतकरी व शेतमजूर यांचीही एकजूट होणे आवश्यक आहे हे ते जाणत होते. परंतु तरीही त्यांची एकजूट करणे व संघटना बांधणे आणि त्यांच्या प्रश्नांत लक्ष घालून ते सोडविण्याचा प्रयत्न करणे हे फार कमी प्रमाणात घडून आले. परिणामतः वर्गलढ्याची कल्पना, निरनिराळ्या कारखान्यांतील कामगार संघटित करणे, एवढ्यापुरतीच मर्यादित झाली.





ट्रेड युनियनची बांधणी करण्यात समाजवादी पक्ष बऱ्याच मोठ्या प्रमाणात यशस्वी झाले. परंतु देशातील सामाजिक-आर्थिक व्यवस्थेत बदल करून आणणे त्यांना शक्य झाले नाही. याचे एक कारण म्हणजे कारखान्यांत किंवा तत्सम क्षेत्रात (उदा. रेल्वे कामगार) काम करणारे कामगार हे या अवाढव्य देशात फार कमी प्रमाणात होते. दुसरे, अधिक महत्त्वाचे कारण म्हणजे या देशातील जातीव्यवस्था. केवळ वर्ग-लढा या देशात प्रभावी ठरू शकत नाही, खोलवर रुजलेली वर्ण व जातिव्यवस्था हे आपले मूलभूत दुखणे आहे. तसेच, जगातील इतर अनेक अविकसित, व विकसित सुद्धा, राष्ट्रांत, पुरुषांनी केलेली व अजूनही करीत असलेली पिळवणूक हेदेखील एक मूलभूत दारूण कारण आहे. या दोन्ही महत्त्वाच्या विषमतेवर समाजवादी लोकांनी फारसा विचारही केला नाही व त्यांची संघटना बांधण्याचा प्रयत्नही केला नाही.

समाजवादी महात्मा गांधींना अत्यंत आदरणीय मानीत होते. परंतु गांधीजींनी आपल्या 'हिंद स्वराज्य' या पुस्तिकेत जे मूलभूत विचार मांडले होते, त्याकडे त्यांचे दुर्लक्षच झाले. आधुनिक कारखानदारी आणि तंत्रज्ञान याद्वारेच आपण प्रगती साधू शकू असा त्यांचा विश्वास होता. याला अपवाद डॉ. राममनोहर लोहियांचा होता. त्यांनी छोट्या छोट्या यंत्रोद्योगांची जरूरी दाखवून दिली. परंतु अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा जोर इतका वाढीस लागला होता की, त्या तंत्रज्ञानाचे खोलवर होणारे परिणाम, विशेषतः पर्यावरणावर होणारे परिणाम लक्षातच घेतले गेले नाहीत.

डॉ. लोहियांनी दोन आणखी घोषवाक्ये समाजवाद्यांना दिली होती. ती म्हणजे 'चौखांबा राज्य' व 'कुदळ फावडा, तुरुंग व मतपेटी' ही होती. पहिल्या घोषवाक्याचा अर्थ असा होती की, या देशात जर लोकशाही-समाजवाद आणावयाचा असेल, तर तो खालील चार खांबांवर आधारीत असला पाहिजे - ते म्हणजे खेडे, जिल्हा, राज्य व मध्यवर्ती सरकार. या चारी स्तरावर देशाचा विकास होणे जरूरी आहे. तर दुसऱ्या घोषणेद्वारे त्यांनी असे सुचविले होते की, समाजवाद्यांनी खेड्यातील कामगार (कुदळफावडे); सर्वसामान्य लोकांचे लढे (तुरुंग) आणि राजकीय सत्ता (मतपेटी) या तिन्हीवर लक्ष केंद्रित केले पाहिजे. प्रत्यक्षात मात्र, समाजवादी पक्षांनी आपली सर्व शक्ती मतपेटीवर केंद्रित केली. १९५२ मध्ये समाजवादी पक्ष राष्ट्रीय स्तरावरील निवडणुकांत उतरला. पक्षाची अशी कल्पना होती की, जरी या निवडणुकांत काँग्रेसने आघाडी मिळवली तरी दुसऱ्या क्रमांकावर आपला पक्ष निवडून येईल. इतकेच काय, पण काही राज्यांत सत्तेवर पण येऊ शकेल. प्रत्यक्षात मात्र या पक्षाला सपशेल आपटी खावी लागली. पक्ष उभारणीच्या पुढील प्रयत्नात पक्षाचे तुकडेतुकडे झाले. शेवटी इंदिरा गांधींच्या आणीबाणीनंतरच्या काळात झालेल्या राष्ट्रीय स्तरावरील निवडणुकात समाजवादी पक्ष 'जनता पक्षात' विलीन झाला. आज, नाव घेता येईल असा 'समाजवादी पक्ष' राष्ट्रीय स्तरावर शिल्लक नाही. काही राजकीय पक्ष व त्यांचे पुढारी स्वतःला 'समाजवादी' म्हणवून घेतात, परंतु ते नावापुरतेच समाजवादी आहेत. नुकत्याच संघटित झालेल्या 'समाजवादी जन परिषदेत' काही प्रामाणिक व उच्च तत्त्वे असलेली माणसे व गट सामील आहेत. परंतु त्यांची शक्ती फारशी महत्त्वाची नाही.

या सर्व ऐतिहासिक पार्श्वभूमीवर 'एकविसाव्या शतकातील समाजवाद' या विषयीचा विचार आपण करावयाचा आहे. आपल्यापुढील सुरुवातीचा प्रश्न हा आहे की, आत्ताच्या काळात समाजवाद कितपत उपयुक्त ठरू शकेल? (Relevant) दुसरा प्रश्न असा आहे की, भांडवलशाही विचारसरणीने जवळजवळ सर्व जग व्यापले असताना, भांडवलशाहीच्या विरोधी असणारी विचारसरणी या जगात कितपत यशस्वी ठरू शकेल?

विसाव्या शतकातील शेवटच्या वीस वर्षांत भांडवलशाही विचारसरणीचा प्रचंड विजय झाला. त्यामुळे कार्ल मार्क्सचे जे तत्त्वज्ञान होते ते पुनरुज्जीवित (Resurrected) झालेले दिसते. सर्व जगभरातील अर्थव्यवस्था धोक्यात येण्याचे (Recession) भय दिसत आहे. राष्ट्राराष्ट्रातील आणि प्रत्येक राष्ट्राच्या अंतर्गतही पिळवणूक करणारे, आणि ज्यांची पिळवणूक होत आहे ते यांच्यातील दरी (Hiatus) वाढत चाललेली आहे, आणि समाजात रुजूही लागली आहे. इतकेच काय, पण अत्यंत प्रगत राष्ट्रांतही पिळवणूक करणारे आणि पिळवणूक सोसणारे यांच्यातील विरोध स्पष्ट दिसू लागला आहे. सर्वच संपन्न राष्ट्रात बेकारी वाढत आहे, कारखाने रुखुटुखू चालत आहेत. आणि गरिबीचे प्रमाण - अगदी श्रीमंत देशातील standards ने सुद्धा - वाढत चालले आहे. विकसनशील देशात, आर्थिक उलाढाल (economic development) कमी होत आहे.

आणि त्यातही जी काही थोडीफार आर्थिक संपन्नता निर्माण होत आहे, तिचा लाभ देशातील श्रीमंतांना मिळत आहे आणि ती संख्या अल्प आहे.

विकसनशील देशांत आंतरराष्ट्रीय कारखानदारी - multinational corporation - वाढत चालली आहे. त्यामुळे या देशातील स्थानिक कारखानदारी रोडावत चालली आहे. नवीनच सुरू झालेल्या उदारीकरण (liberalisation), जागतिकीकरण (globalisation), खाजगीकरण (privatisation), तंत्रउत्पादनाचे आंधळे (indiscriminate) अनुकरण या सर्व गोष्टींमुळे अधिकाधिक लोक गरिबीत पिचत चालले आहेत. अर्थात या देशाच्या सत्ताधीशांना ही गोष्ट दिसत असूनही मान्य होत नाही. याची दोन कारणे आहेत. पहिले कारण असे की, विकसनशील देशांवर जागतिक बँक व आंतरराष्ट्रीय नाणेनिधी (International Monetary Fund) यांचा दबाव आहे. आणि दुसरे कारण असे की, जागतिक व्यापार संघटना (World Trade Organisation) प्रभावशाली झाल्यामुळे स्थानिक शेती, छोटेछोटे उद्योगधंदे व त्यांच्या उत्पादनांना वाव मिळत नाहीसा झाला आहे. जागतिक बँकेचे सर्व व्यवहार अमेरिका, पश्चिम युरोपातील राष्ट्रांतर्फे चालतात. त्यामुळे त्या देशांचा फायदा कसा होईल हे पाहिले जाते. मग आशिया, आफ्रिका आदि तिसऱ्या जगातील लोकांचे व्यवसाय व कारखानदारी धोक्यात येतात. ज्या आशिया खंडातील देशांना आशियाई वाघ असे संबोधले जाते ते देशही, यात जपानसारखा प्रगत देशही आला, कर्जबाजारी (bankrupt) होत चालले आहेत. आणि त्यांची कारखानदारी आंतरराष्ट्रीय कारखान्यांच्या हातात गेली आहे. जपान देखील या धक्क्यातून अजून सावरलेला नाही.

एकविसाव्या शतकातील महत्त्वाची घडामोड म्हणजे जगातील राष्ट्रांचे ध्रुवीकरण होय. श्रीमंत राष्ट्रांच्या हातात अधिकाधिक संपत्ती, मोठमोठी कारखानदारी, आणि त्यांतून निर्माण होणारे आर्थिक वर्चस्व एकत्रित होत आहे. त्यामुळे तिसऱ्या जगातील गरीब राष्ट्रे अधिकाधिक गरीब होत चालली आहेत. अशा परिस्थितीत जगभर या पिळवणुकीविरुद्ध आवाज उठविण्याची गरज भासू लागली आहे, आणि तशी शक्यताही दिसत आहे. या परिस्थितीविरुद्ध आवाज उठविणाऱ्या चळवळी कुठले नाव घेऊ देत, परंतु त्यांची ध्येयधोरणे समाजवाद प्रस्थापित करण्याच्या बाजूचीच असतील यात शंका नाही. म्हणूनच असे म्हणता येईल की, एकविसाव्या शतकात समाजवादी विचारसरणीचा प्रभाव जगभर वाढत जाणार आहे.

आता प्रश्न असा पडतो की, या शतकातील समाजवाद हा गेल्या अठराव्या, एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील समाजवादापेक्षा वेगळ्या स्वरूपाचा असणार आहे का? नजिकच्या भविष्यकाळात डोकावून पाहताना असे दिसते की, गेल्या शतकांपेक्षा हा समाजवाद वेगळ्या स्वरूपाचा असेल, तरीही, अर्थात ध्येय प्रामुख्याने तेच असेल. ते वेगळे स्वरूप काय असेल याविषयीचं सखोल चिंतन समाजवाद्यांनी करणे जरूरीचे आहे.

भांडवलशाहीने या कालखंडात आपले जाळे जगभर फेकलेले आहे. 'जागतिक बँक', 'आंतरराष्ट्रीय नाणेनिधी', 'जागतिक व्यापार संघटना', 'आंतरराष्ट्रीय कारखानदारी' यांच्याद्वारे विकसनशील व अविकसित या दोन्ही प्रकारच्या राष्ट्रांभोवती हे जाळे आवळले जात आहे. यांच्या विरोधात उठण्यासाठी समाजवादाला देखील जागतिक पातळीवर एकत्रित होणे जरुरीचे आहे. संघटना बांधणीचे काम, त्यांची कार्यपद्धती, कार्यक्रम आणि त्या कार्यक्रमांसाठी प्रभावी यंत्रणा (tactics) हे सर्व विचारपूर्वक करणे जरूर आहे.

जागतिक स्तरावर आपला प्रभाव पाडण्यासाठी अमेरिकेतील 'सियाटल्' व इटलीतील 'जिनोआ' येथे या विचारधारांच्या कार्यकर्त्यांनी एकत्र येऊन जागतिक व्यापार संघटनेच्या बैठकीविरुद्ध जी प्रचंड प्रमाणावर निदर्शने केली ती या प्रयत्नात बोलकी आहेत. हळूहळू जगभरातील लोक एकत्र येत आहेत, व भांडवलशाहीच्या जुलुमांविरुद्ध लढा देत आहेत.

कार्ल मार्क्सने भविष्य वर्तवले होते, त्यानुसार कारखान्यांतील कामगार सर्वाधिक वेगाने एकत्र येतील असे चित्र दिसत होते. परंतु, बरोबर किंवा चूक हे आपण सांगू शकत नाही, तरी देखील कारखान्यांतील कामगारांना एकत्रित होऊन भांडवलशाही उलथून पाडावी असे वाटते असं दिसत नाही. सध्याच्या काळातील ट्रेड युनियन देखील साम्यवादाचे धडे कामगारांना देत नाहीत. असे होण्याची प्रमुख कारणे म्हणजे आज अनेक वर्षे कमीकमी होत चाललेली कारखानदारी, त्यामुळे वाढत चाललेली बेकारी, नवनवीन

तंत्रज्ञानामुळे कामगारांची कमीकमी होत चाललेली गरज आणि मध्यमवर्गीय होण्याकडे त्यांचा झुकलेला कल ही आहेत. परिणामतः कामगारवर्ग आपले वडील व आजोबा ज्याप्रमाणे विचार करीत होते त्याप्रमाणे विचार करीत नाहीसे होत आहेत.

याउलट असंघटित मजूर व कारागीर हे वर्ग स्वतःच्या अस्तित्वाच्या लढ्यात सहभागी होऊ लागले आहेत. कारण आज सर्वात जास्त पिळवणूक त्यांची होत आहे. त्यामुळे समाजवादी कार्यकर्त्यांनी या वर्गाकडे अधिकाधिक लक्ष देण्याची व त्यांना मोठ्या प्रमाणात संघटित करण्याची गरज आहे. उद्या हाच वर्ग समतेच्या लढ्यात पुरोगामी असेल.

भारतातील समाजवाद्यांनी आता दलितांच्या प्रश्नांत सखोल लक्ष घालण्याची जरुरी आहे. कारण हा वर्ग भारतातील सर्वाधिक पिळला जाणारा आहे, आणि अत्यंत क्रूरपणे लुबाडला जाणाराही आहे. स्वतःचा जीव जगविण्यासाठीसुद्धा त्यांच्या हातात काही हक्क नाहीत. जे हक्क त्यांना घटनेने मिळालेले आहेत ते प्रत्यक्षात कागदावरच राहत आहेत. वरिष्ठ जातीतील कार्यकर्ते व पुढारी यांची भाषा त्यांना समजतसुद्धा नाही. त्यांना त्यांच्यातीलच कार्यकर्ते व त्यांची भाषा बोलणारे व समजून घेणारे कार्यकर्ते हवे आहेत. या पूर्वीच्या कालखंडात समाजवाद्यांनी दलित - यात आदिवासीसुद्धा आले - सामाजिक व आर्थिक क्रांतीत कसे सहभागी करून घ्यावेत या प्रश्नाकडे फारसे लक्ष दिले नाही. १९५२ सालच्या पहिल्या सार्वत्रिक निवडणुकांचे वेळी समाजवाद्यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या 'शेड्युल कास्ट फेडरेशनशी' समझोता केला हे खरे, परंतु तो निवडणुका जिंकण्यासाठी केलेला प्रयत्न होता. त्यावेळी त्यांच्या हे लक्षात आले नाही की, दलित व आदिवासी, सर्वाधिक पिळले जाणारे असल्यामुळे ते आपल्या क्रांतिकार्यात आघाडीवर असू शकतील. समाजवादी स्वतःला खरेखुरे क्रांतिकारक समजत होते. आणि दलित आणि इतर मागासवर्गीय यांना आपले पाठीराखे मानत होते. अर्थात प्रत्यक्षात दलित त्यांच्या पाठीमागे गेले नाहीत. खरे म्हटले तर समाजवादी क्रांतीचे अग्रदूत दलित व इतर मागासवर्गीय असावयास पाहिजे होते. कारखान्यातील कामगार वर्गाला क्रांतीचे अग्रदूत मानणे चुकीचे होते.

समाजवादी, मग ते कितीही अर्थिक व सामाजिक क्रांतीच्या भावनेने भारलेले असोत, ते बहुतांशी वरिष्ठ वर्ग व जातींमधील होते. दलित, इतर मागासवर्गीय व आदिवासी यांनाच पुढारीपण देणं व आपण त्यांच्या पाठीशी उभे राहणे हेच उचित आहे, हे समाजवाद्यांच्या लक्षात येणे गरजेचे आहे. आता हे कसे घडवून आणावयाचे हा समाजवाद्यांसमोरील यक्षप्रश्न आहे.

प्रत्यक्षात असे दिसून येते की, दलित व इतर मागासवर्गीय आपल्या, प्रश्नांच्या बाबतीत अधिकाधिक प्रमाणात जागरूक होत आहेत. वीस वर्षांपूर्वी असे चित्र नव्हते. सामाजिक क्रांती कशी घडवून आणावयाची याविषयीच्या त्यांच्या कल्पना स्पष्ट होत आहेत. त्यामुळे एकविसाव्या शतकात सामाजिक व आर्थिक क्रांतीं घडवून आणण्यात त्यांची प्रमुख भूमिका असेल.

आजपर्यंत समाजवाद्यांनी. दुर्लक्षिलेला आणि एक महत्त्वाचा समाजातील घटक म्हणजे स्त्रिया. स्त्रियांची पिळवणूक तर पुरुषांपेक्षाही अधिक मोठ्या प्रमाणात व अधिक कठोर पद्धतीने होत आहे. समाजातील पिळवणूक थांबविण्यासाठी समाजवाद्यांचे जे प्रयत्न चालू आहेत त्यात त्यांनी स्त्रियांनाही सहभागी करून घेणे अत्यंत जरूरीचे आहे. नाहीतर ती समाजवादी विचारधारा एकांगी असेल. या बाबतीत अलीकडच्या काळात अनेक सुशिक्षित व विचारी (विद्वान) स्त्रिया या पिळवणुकीच्या विविध अंगांविषयी संशोधन व लेखन करीत आहेत. त्यापैकी काही या क्रांतीकार्यात सहभागीही झालेल्या आहेत. काही सामाजिक संस्थाही हे काम करू लागल्या आहेत. त्यामुळे पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून दलित व इतर मागासवर्गीय स्त्रिया पुढाकार घेऊ लागल्या आहेत व स्त्रियांची पिळवणूक रोखण्यासाठी कार्यासही लागल्या आहेत.

तत्काळ डोळ्यात भरणाऱ्या मालक-मजूर प्रश्नाबरोबरच, अलीकडच्या काळात इतरही पिळवणुकीचे अनेक प्रकार आढळून येऊ लागले आहेत, याचे सर्वात ठळक उदाहरण म्हणजे 'जागतिक बँक' व 'आंतरराष्ट्रीय नाणेनिधी' यांचे राष्ट्राच्या विकासावर होणारे वाढते परिणाम. यापैकी पर्यावरणावर होणारे परिणाम अतिशय महत्त्वाचे आहेत. सर्व गरीब व विकसनशील देशांतील गरिबांचे भविष्य पर्यावरणीय संतुलनावर अवलंबून असते. निसर्गाने जे अन्न मिळविण्याचे स्रोत मानवाला उपलब्ध करून दिलेले आहेत, त्यांवरच गदा येऊ लागली आहे. मोठमोठे कारखाने, मोठमोठी धरणे निरनिराळ्या राष्ट्रात बांधण्यासाठी व उभारण्यासाठी

'जागतिक बँक' आणि 'आंतरराष्ट्रीय नाणेनिधी' मोठ्या प्रमाणात कर्जे देत आहे. या कर्जांना अर्थातच अटी आहेत. हे कारखाने व अशी धरणे शेतजमीन व अरण्यांवर आक्रमण करीत आहेत. त्यामुळे अनेक गरीब व आदिवासी कुटुंबे उद्ध्वस्त होत आहेत, नाहीतर विस्थापित होत आहेत. त्यामुळे गरिबीच्या गाळात अधिकाधिक प्रमाणात रुतत चालली आहेत. रहायला जागा नाही, कसायला शेत नाही म्हणून ही कुटुंबे शहरात गर्दी करू लागली आहेत. त्यामुळे शहरातील बकाल वस्ती वाढत आहे. या वस्त्यात या लोकांना पाण्यासारख्या प्राथमिक सुविधांपासूनही वंचित राहावे लागते. कारखान्यातील प्रदूषित पाणी व इतर कचरा, तसेच शहरातील प्रदूषित केरकचरा यामुळे जवळपासच्या नद्या व समुद्रही प्रदुषित होऊ लागले आहेत. शहरातील लोकांचे जिणे अधिकाधिक प्रमाणात आरोग्याला हानीकारक बनत चालले आहे. खरे पाहता आजच्या ह्या जागतिक भांडवलशाहीच्या युगात आपल्या संपूर्ण पृथ्वीचेच अस्तित्व धोक्यात आले आहे. होणारी आर्थिक प्रगती किती काळ तग धरू शकेल याविषयीही काही भविष्य वर्तविणे अवघड आहे. समाजवाद्यांच्या पूर्वीच्या पिढ्यांत हे प्रश्न उद्‌भवले नव्हते, परंतु आजच्या समाजवाद्यांना या महत्त्वाच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

पूर्वीच्या काळी समाजवादी हे धरूनच चालले होते की, कारखानदारी वाढत जाणार आणि तसेच तंत्रज्ञानातही प्रगती होत जाणार. गरिबी नाहीशी करण्यासाठी हे सर्व आवश्यकच आहे असे त्यांना वाटत होते. म्हणून त्यांचा रोख कारखानदारी कोणाच्या ताब्यात असावी, त्यांची योजना (planning) कोणी करावे, त्यातून निर्माण होणाऱ्या संपत्तीचे वितरण कसे करावे वगैरे विषयीच होता. परंतु कारखानदारीचे मूलभूत स्वरूप काय, वाढत्या तंत्रज्ञानाचे परिणाम काय, याविषयी विचार होत नव्हता. डॉ. राम मनोहर लोहियांनी छोट्या छोट्या कारखान्यांचे महत्त्व जाणले होते आणि कारखाने केवळ मोठ्या शहरात एकत्रित व्हावयास नकोत, असाही विचार मांडला होता. परंतु याविषयी नंतर फारसा विचार केला गेला नाही.

आज परिस्थिती पूर्णतः वेगळी आहे. जागतिक स्तरावरील कारखानदारी प्रचंड मोठ्या प्रमाणात वाढत चालली आहे. आणि या कारखान्यांचे मुख्य उद्दिष्ट नफा मिळवणे आणि अधिकाधिक नफा मिळवणे हे आहे. त्यामुळे औद्योगिकरणाविषयी वेगळा विचार करणे सुरू झाले आहे. कारण याचे समाजावर होणारे दुष्परिणाम दिसू लागले आहेत. कारखानदार फक्त स्वतःचा फायदाच पाहत असतात. आपल्या कारखान्यात काय निर्माण होते, ते कोणासाठी निर्माण होते, कुठे आणि कसे निर्माण होते याविषयी त्यांना काहीच देणेघेणे नसते. केवळ अधिकाधिक नफा कसा मिळवता येईल एवढेच त्यांचे लक्ष्य असते. आपल्या कारखान्यातून तयार होणारा माल लोकांना हितावह होणार आहे काय किंवा जनतेला त्या मालाची खरोखरच गरज आहे काय याची त्यांना पर्वा नसते. तसेच आपल्या कारखान्यातील निर्मिती हवा किंवा पाण्याचे प्रदूषण होऊ देत नाही ना, भांडवलाचा वापर समाजाला हितकारकच ठरेल ना याविषयी ते बेफिकीर असतात. परंतु आज हे प्रश्न ऐरणीवर आलेले आहेत आणि समाजवाद्यांना त्याची दखल घ्यावीच लागणार आहे.

अतिप्रचंड वेगाने चाललेली, डोळे विस्फारून टाकणारी तंत्रज्ञानातील प्रगती, विशेषतः माहिती तंत्रज्ञान, हे देखील समाजवादापुढे एक मोठे आव्हान आहे. तंत्रज्ञानाचा वाढता प्रभाव चांगला किंवा वाईट असा नसतो, तो neutral असतो हे खरे, का या प्रभावाचेही अनेक परिणाम असू शकतात आणि त्यातील काही वाईट असू शकतात, हे खरे? वाढत्या तंत्रज्ञानाची निर्मिती करणारे, कुठलेही तंत्रज्ञान वाढवत न्यावयाचे हे ठरविणारे आणि ते नवनवे तंत्रज्ञान कशासाठी उपयोगात आणावयाचे हे ठरविणारे जे कोणी आहेत, त्यांचे हात अधिकाधिक बळकट होत चालले आहेत, आणि ज्यांना हे शक्य नाही ते अधिकाधिक दुर्बल होत चालले आहेत. तंत्रज्ञान कुण्या एकाचा मक्ता होऊ शकते काय? ते दुसऱ्यांना देण्यासाठी भरमसाठ नफा मिळवणे जरूरी आहे काय? का ते तंत्रज्ञान जगातील सर्वांचे कल्याण (wellbeing) होण्यासाठीच वापरले जावे?

सध्याच्या श्रम वाचविणाऱ्या तंत्रज्ञानामुळे आपण अशा स्तरावर येऊन पोहोचलो आहोत की, ज्यामुळे कामे (नोकऱ्या) कमी कमी होत जाणार आहेत. आणि कामगारांची जरूरच उरणार नाही. त्याचप्रमाणे आंतरराष्ट्रीय प्रबळ बँका व आंतरराष्ट्रीय कंपन्या आपापला फायदा पाहून गरीब व विकसनशील देशांतील चलन व अर्थव्यवस्था आपापल्या मर्जीप्रमाणे वळवून घेऊ शकतील. यासाठी अत्याधुनिक दळणवळणाची (communication techniques) साधने त्यांना भरपूर उपलब्ध आहेत. यापुढे जाऊन आणखीही एक

अनुक्रमणिका






प्रश्न उद्भवतो, तो म्हणजे अत्याधुनिक तंत्रज्ञान या गरीब व विकसनशील देशांनी जरी आत्मसात केले, तरी त्यामुळे गरीब जनतेच्या श्रमप्रतिष्ठेला बाधा येणार नाही का? हे प्रश्न आणि अशा प्रकारचे तंत्रज्ञानाच्या बाबतीतील प्रश्न याविषयी समाजवाद्यांनी गंभीरपणे विचार करणे जरूरीचे आहे.

समाजवादी विचारसरणीचा मुख्य मुद्दा काय आहे ते समजून घेतले तर आपल्या लक्षात येईल की, उत्पादन प्रक्रिया सर्व समाजाच्या मालकीची असली पाहिजे, हा तो मुद्दा होय. यापुढच्या काळातही हाच मुद्दा महत्त्वाचा राहणार आहे. कारण उत्पादनाच्या मालकीचे खाजगीकरण आणि त्यामुळे मालक करू शकलेली कामगारांची पिळवणूक मालकांच्या फायद्याची ठरते. आणि तशी पिळवणूक समाजाच्या सर्व स्तरांवर होऊ शकते. या मुख्य मुद्द्यावर मात्र सोव्हिएट रशियाचा अनुभव समाजवादी विचारसरणीला धक्का देणारा आहे. सुरुवातीच्या काळात सोव्हिएट रशियाची क्रांती कामगार व पिळवणूक होणाऱ्यांना वरदान ठरेल असे वाटत होते. परंतु क्रांतीनंतर सर्व सत्ता एका गटाच्या हातात एकवटली गेली आणि ती हळूहळू एका व्यक्तीच्या हातात एकवटली. केवळ राजकीय सत्ता नव्हे, तर आर्थिक सत्ताही अशीच एकवटली गेली. त्यामुळे मध्यवर्ती सरकार करेल तो कायदा अशी परिस्थिती निर्माण झाली. त्यामुळे रशियन क्रांतीचा मूळ उद्देशच बाजूला पडला आणि मध्यवर्ती सरकारातील सत्ताधाऱ्यांत एकमेकांना नामोहरम करण्याची स्पर्धा सुरू झाली. याच्याही पुढे जाऊन, प्रतिस्पर्ध्यांना ठार मारून एकाधिकारशाही प्रस्थापित झाली.

सध्या भारतातील परिस्थिती कशी आहे? ज्यांची जरूरी नाही असे सरकारी अधिकार, आणि राज्यव्यवस्थेतील राजकीय पक्षांचे हस्तक्षेपामुळे आपल्या देशातील फार मोठा सार्वजनिक उद्योगसमूह (public sector) धोक्यात येत आहे. कारण पायाभूत उद्योगधंदे तसेच अवजड (heavy) उद्योगधंदे आणि इतरही राष्ट्रीयीकरण झालेले उद्योगसमूह यांचे आवाज दडपले जात आहेत. परंतु या हस्तक्षेपावर होणारी सर्वच टीका योग्य आहे असे नाही, त्याचप्रमाणे काही अपवादात्मक उद्योगसमूह वगळता फार चांगली धोरणे राबवत आहेत असे नाही. तेही कामगारांना व ग्राहकांना शक्य तेवढे पिळून घेतच आहेत.

आजकाल भारतात सर्वत्र असा समज पसरलेला आहे की, सार्वजनिक उद्योगसमूह हे कर्तबगार (effcient) नाहीत आणि वेळेचा व पैशांचा अपव्यय करतात. त्याचप्रमाणे असेही मानले जाते, सार्वजनिक क्षेत्रात भ्रष्टाचार फार मोठ्या प्रमाणात चालतो, इतकेच नव्हे तर वरीष्ठ अधिकाऱ्यांतही असा भ्रष्टाचार पसरलेला आहे. लोकांचे असे मत होण्यास काही व्यक्ती व राजकारणी लोकही कारणीभूत आहेत. त्यामुळे आज समाजवाद्यांपुढील मुख्य प्रश्न हा आहे की, ही अधोगती कशी रोखायची? नाहीतर, हे सामाजिक उद्योगसमूह हळूहळू एका गटाच्या किंवा एका व्यक्तीच्या हातात एकवटतील. या प्रश्नातील महत्त्वाचा मुद्दा म्हणजे सामाजिक उद्योग समूह (Social Ownership) व मध्यवर्ती किंवा राज्यातील सरकारांच्या अधिपत्यात असलेले उद्योगसमूह यात फरक केला पाहिजे. सामाजिक किंवा सार्वजनिक उद्योगसमूह आपण एका व्यक्तीच्या किंवा एका गटाच्या हातातून सोडवू शकतो आणि योग्य असे सार्वजनिक हिताचे, सर्वांना समान हक्क असलेले व लोकशाही पद्धतीने चाललेले उद्योगसमूह स्थापू शकतो.

यापुढील प्रश्न असा उद्भवतो की, जमीन सुद्धा सार्वजनिक मालकीची असली पाहिजे का? सोव्हिएट रशियातील किंवा चीनमधील असे प्रयत्न यशस्वी झाले नाहीत. उलट बाजूने पाहता, आताची जमीन मालकीची पद्धतही समाजवादी विचारसरणीशी सुसंगत नाही. आता अस्तित्वात असलेला कूळ कायदा अधिक काटेकोरपणे लावला गेला पाहिजे. तसेच गैरहजर असलेल्या मालकांचे हक्क व भाड्याने द्यावयाची जमीन या प्रथांवरही अधिक कठोरपणे विचार करणे जरूर आहे. याबाबतीत डॉ. राममनोहर लोहिया यांचे विचार लक्षात घेणे जरूर आहे. त्यांनी 'चौखंबा राज्य पद्धती' हा विचार मांडला होता. थोड्याफार फरकाने हा विचार आपल्या राज्यघटनेच्या ७३ व्या कलमानुसार मान्य केला गेलेला आहे. परंतु हा विचार अमलात आणण्याची जबाबदारी राज्य सरकारवर सोपवली गेली आहे. आणि ती तरतूद अमलात आणण्याच्या बाबतीत चालढकल होत चाललेली आहे. सध्याच्या काळातील राजकारणी स्वतःच्या ताब्यात शक्य तेवढी जास्त सत्ता ठेवू पाहत आहेत. त्यामुळे निम्न स्तरांतील जनतेकडे सत्ता सोपविणे त्यांच्या स्वतःच्या हिताचे नाही हे ते जाणतात.

प्रत्यक्षात पाहता खराखुरा लोकशाही समाजवाद अस्तित्वात आणावयाचा असेल, तर सर्वात खालच्या स्तरांतील लोकांच्या हातात सत्ता आली पाहिजे. आणि ती त्यांच्यावर

उपकार म्हणून सरकारने सोपवावी असे नाही, तर ती सत्ता त्यांचा हक्क म्हणून मान्य केली गेली पाहिजे. अशा स्वरूपाच्या विकेंद्रीकरणाखेरीज सर्वसामान्य लोकांच्या हातात सत्ता येणे शक्य नाही. सध्याच्या काळातील धोरणांप्रमाणे सध्याच्या विकासाच्या योजना श्रीमंतांना झुकते माप देणाऱ्या आहेत. त्या पूर्णपणे बदलल्याखेरीज सर्वसामान्य जनतेच्या निरनिराळ्या विकास घडवून आणण्याच्या कल्पना प्रत्यक्षात येऊ शकणार नाहीत. 'हमारे गाव में हमारा राज' ही घोषणा प्रत्यक्षात उतरणे त्याशिवाय शक्य नाही. आजच्या समाजवादाला या कल्पनेत प्रमुख स्थान मिळाले पाहिजे.

एक प्रकारच्या कडक लष्करी शिस्तीत बांधला गेलेला समाज म्हणजे समाजवादी समाज, असे चित्र समाजवादाच्या विरोधात उभे असलेले लोक समाजापुढे उभे करतात. आजच्या जगात मानवाचे मूलभूत हक्क आणि व्यक्तिस्वातंत्र्य ह्या कल्पना मान्यता पावलेल्या आहेत आणि या कल्पनांना धक्का पोचविणाऱ्याला कायदेशीर बडगा दाखविला जातो. अर्थात भांडवलशाही देशांतही सर्वसामान्य जनतेचे हक्क आणि त्यांचे स्वातंत्र्य हिरावून घेतले जाते हे सर्वज्ञात आहे. विशेषतः परिस्थितीने गरीब असणाऱ्यांच्या बाबतीत हे फारच खरे आहे. आजकाल काही विद्वान जमातवाद (communitarianism) हा याबाबतीत अडथळा मानून व्यक्तीस्वातंत्र्याला मान्यता देत नाहीत. या पेचातून बाहेर येण्यासाठी समाजवादी विचारसरणीला व्यक्तिस्वातंत्र्य आणि समाजाचे कल्याण या दोन वेगवेगळ्या संकल्पनांचा विचार करून त्यातून मार्ग काढणे जरूर आहे.

समाजवादाचे एक महत्त्वाचे तत्त्व म्हणजे समाजाची आर्थिक बांधणी (economic planning) निश्चित करणे. तसे असणे जरूरही आहे. राष्ट्रातील नैसर्गिक साधनसंपत्ती आणि लोकांच्या नवनवीन योजना (human resources) या योग्य प्रकारेच अंमलात आणल्या गेल्या पाहिजेत. त्यांची उधळमाधळ, स्वतःच्या फायद्यासाठी होणारा वापर (looted) किंवा त्या संपत्तीचे प्रदूषण हे रोखले जाणे जरूर आहे. ही उधळमाधळ, हा फायद्यासाठी वापर किंवा हे प्रदूषण कशामुळे निर्माण होते? याचे सर्वात महत्त्वाचे कारण म्हणजे उद्योगधंद्यांचे व आता शेतीचेही खाजगीकरण व त्यातून उद्‌भवणारी लुबाडणूक हे आहे. काही लोकांचे खिसे भरण्यासाठी अनेकांना अर्धपोटी व झोपडपट्ट्यात राहावे लागते. आपल्या राष्ट्रात जे निर्माण होते त्याचे वितरण करण्यासाठी उद्योगधंद्यांना पूर्ण स्वातंत्र्य देणे (free market) हे उपयुक्त नाही. परंतु या बाबतीत धोरण ठरवावयाचे ते वेगवेगळ्या स्तरांवर झाले पाहिजे आणि ते मुख्यत्वेकरून खेड्यापाड्यातून ठरविले गेले पाहिजे. मध्यवर्ती सरकारकडून लादले गेलेले आर्थिक धोरण अत्यंत चुकीचे ठरेल. कारण त्यात सर्वसामान्य जनतेचा सहभाग असणार नाही.

या सर्व विचारांच्या शेवटी आपल्याला हे लक्षात येते की, एकविसाव्या शतकात समाजवादी विचारसरणीची जगात अत्यंत गरज आहे. परंतु आजच्या जगातील आर्थिक आणि राजकीय परिस्थिती या विचारसरणीला मान्यता मिळवून देणार नाही. गेल्या शतकापेक्षा या शतकातील परिस्थिती खूप बदलली आहे. विशेषतः गेल्या वीस आणि तीस वर्षांत जगातील राजकीय परिस्थिती आणि जगभर पसरलेली भांडवलशाही, नि त्या भांडवलशाहीचे वेगवेगळे व्यूह आणि त्यानुसार होणारी धोरणे समाजवादी विचारसरणीस घातक आहेत. वेगाने विकसित होणारे तंत्रज्ञान जगात एक क्रांतीच जणू घडवून आणू पाहत आहे. व्यक्तिगत आणि सामाजिक मूल्येही वेगाने बदलत आहेत. एकविसाव्या शतकातील समाजवादाने या सर्वांचा विचार करणे गरजेचे आहे. असा विचार करून, नवीन तत्त्वे, नवी ध्येये (ideology), नवीन धोरणे व नवीन कार्यक्रम आखले पाहिजेत. अर्थात या सगळ्यात आपली मूलभूत तत्त्वे - पिळवणुकीचा नायनाट करणे, बळजबरी नाहीशी करणे, गरिबी दूर करणे, अन्यायी समाजरचना हटविणे आणि पृथ्वीतील नैसर्गिक स्त्रोतांचे रक्षण - ही विसरता कामा नयेत.

✠ ✠ ✠

(श्री. बगाराम तुळपुळे यांचा वरील व यापुढील दोन लेख Janata Weekly मधून साभार घेण्यात आले आहेत. अनुवाद श्रीमती सुमन दाभोलकर यांनी केला आहे.)

# जागतिकीकरण : एक राजकीय आव्हान

बगाराम तुळपुळे

(लेखांक : २)

'देश बचाओ, देश बनाओ' हा २००३ साली केरळातून निघालेला मोर्चा जवळजवळ सर्व राज्यांतून जाऊन अयोध्येस समाप्त झाला. हा मोर्चा एक महत्त्वाचा कार्यक्रम होता, आणि त्याची योजना ज्या लोकांनी केली होती, आणि ती पूर्णत्वास नेली होती त्या सर्वांना धन्यवाद देणे जरूरीचे आहे. आतापर्यंत ज्या बातम्या आल्या आहेत, त्यानुसार ज्या ज्या राज्यातून हा मोर्चा गेला तेथील लोकांनी त्यात उत्स्फूर्तपणे सहभाग घेतला आणि जे सहभाग घेऊ शकले नाहीत त्यांनी प्रोत्साहन दिले.

अशा प्रकारचा मोर्चा केवळ यशस्वी होऊन चालत नाही. 'देश बचाओ, देश बनाओ' हे आपले ध्येय आहे, आणि त्या ध्येयाप्रत जाण्यासाठी फार मोठ्या क्षेत्रात वेगवेगळे कायम स्वरूपाचे कार्यक्रम हातात घेणे जरूर आहे. हा मोर्चा सफल झाल्यानंतरच्या काही महिन्यांतच असे लक्षात येऊ लागले की, ह्या मोर्चाच्या योजनाकारांसमोर आणि त्यात प्रत्यक्ष भाग घेणाऱ्या कार्यकर्त्यांसमोरही काही ठोस कार्यक्रम नाहीत. त्यामुळे त्या मोर्चाचा परिणाम म्हणून जो उत्साह आणि जो जोश सामील होणाऱ्यांच्यात निर्माण झाला होता, तो हळूहळू कमी कमी होत चाललेला आहे. कदाचित माझे हे मत माझ्यापर्यंत पुरेशी माहिती न आल्यामुळे झाले असेल.

'देश बचाओ, देश बनाओ' ही घोषणा जे गंभीरपणे घेतात, त्यांनी ती घोषणा प्रत्यक्षात आणण्याचे कामही गंभीरपणे केले पाहिजे. त्यासाठी त्यांनी कार्यक्रम आखून घेतले पाहिजेत आणि ते प्रत्यक्षात आणण्यासाठी आवश्यक ते प्रयत्न केले पाहिजेत. मुख्यत्वेकरून या कार्यकर्त्यांच्या मनात, वाढत चाललेली जुलूम-जबरदस्ती, मोठ्या प्रमाणात होणारे विस्थापन, वाढत चाललेली गरिबी, दडपणूक आणि या सर्वांविरुद्ध आवाज उठविण्याची असमर्थता हे सर्व खदखदते आहे. या सर्व बाबींकडे ताबडतोब लक्ष देणे जरूर आहे. परंतु यापुढे जाऊन, जी मूलभूत कारणे या परिस्थितीमागे आहेत, ती माझ्या मते खालील स्वरूपाची आहेत. पहिले मूलभूत कारण म्हणजे आपल्या देशाने स्वीकारलेले आर्थिक धोरण हे आहे. १९९० सालापासून हे धोरण स्वीकारले गेले आहे.

या धोरणाचा परिणाम म्हणून, मुक्त बाजार-व्यवस्था, वाढते खाजगीकरण व जागतिकीकरण या गोष्टी आहेत. त्यामुळे आपल्या देशातील यंत्रोद्योग कमी होत चालले आहेत व बेकारी वाढते आहे. तसेच या धोरणामुळे गरीब व श्रीमंत यांमधील दरी वाढत चाललेली आहे. सर्वसामान्य लोकांची अनेक प्रकारे पिळवणूक होत आहे. विशेषत: जे दरिद्री आहेत त्यांचे पोटापाण्याचे उद्योगही चालत नाहीसे झाले आहेत. प्रगतीच्या नावावर चाललेली ही अधोगती आहे आणि म्हणूनच, आमच्या मते, या विरुद्धच प्रथम आवाज उठवला पाहिजे.

आपल्यासारख्या विकसनशील देशांवर ही तथाकथित प्रगती देशाबाहेरील प्रगत देशांनी लादलेली आहे. या प्रगत देशातील 'जागतिक बँक', 'आंतरराष्ट्रीय नाणेनिधी', आणि 'जागतिक व्यापार संघटना' या संस्थांद्वारे ती लादली गेली आहे. जगातील अविकसित व विकसनशील देशातील जनतेच्या ही गोष्ट हळूहळू लक्षात येऊ लागली आहे. याचा परिणाम म्हणून 'जागतिक सामाजिक संघटना' (World Social Forum) स्थापन झाली आहे. इतर कुणाचीही मदत न घेता, विशेषत: सरकारी मदत न घेता, या स्वयंचलित (voluntary) संस्था आपले काम करीत आहेत. ही कामे प्रामुख्याने गरिबांचे हाल, उपेक्षा व आर्थिक अन्याय (economic injustices) याविरुद्ध चालू आहेत. हे सर्वच अन्याय, व हाल अपेष्टा जागतिकीकरणामुळे झालेल्या आहेत असे म्हणता येणार नाही. त्यापैकी बऱ्याचशा पूर्वापार चालत आलेल्या रूढी व परंपरा, तसेच आपली स्वार्थी राज्यव्यवस्था यातून निर्माण झालेल्या आहेत. काही प्रकारची अधोगती आधुनिक स्वरूपाची आहे. ती म्हणजे गरिबांचे जगण्याचे हक्क हिरावून घेणे. जमीन, पाणी, जंगल, मासेमारी हे सर्व मोठमोठ्या आर्थिक संस्था, ज्या केवळ आंतरराष्ट्रीयच नाहीत,







अनुक्रमणिका

तर आपल्या देशातीलही आहेत, गरिबांच्या हातातून काढून घेऊन प्रचंड मोठ्या प्रमाणात स्वतःच्या ताब्यात घेतल्या जात आहेत. परिणामतः लक्षावधी लोक विस्थापित झाले आहेत आणि अजूनही होत आहेत. आणि हे सर्व आपल्या देशाला प्रगती पथावर नेण्यासाठी होत आहे. ही प्रगती कशी साधली जात आहे? तर ती मोठमोठी धरणे बांधून, मोठमोठे कारखाने काढून, अधिकाधिक रुंद रस्ते बांधून, लहान लहान गावांचे मोठ्या शहरात रूपांतर करून होत आहे. आणि हे सर्व घडवून आणण्यासाठी 'जागतिक बँक', 'आंतरराष्ट्रीय व्यापार संघटना', 'जागतिक व्यापार संघटना' आपल्यावर दबाव आणत आहेत. आणि हे सर्व जगात इतरत्रही होत आहे. तरीही हे लक्षात घेतले गेले पाहिजे की, आपल्या राष्ट्राची धोरणे (policies) ठरविणारी राज्यव्यवस्था या सर्वाला प्रोत्साहन देत आहे व हातभार लावत आहे. कारण त्यात ही राज्यव्यवस्था चालविणाऱ्या लोकांचा स्वार्थ आहे. त्यामुळे ह्या सर्व आंतरराष्ट्रीय संस्थांच्या हातातील बाहुले बनण्यास त्यांना विधिनिषेध वाटत नाही.

आजकाल, आपल्यापुढे हा प्रश्न आहे की, अशी बाहुले बनण्यास नकार देणे आपल्या सरकारला शक्य नाही काय? आणि समजा असा नकार दिला तरीही आपल्या देशातील गरिबांची पिळवणूक व दारिद्र्य आज आहे तसेच राहिले असते काय? ह्या प्रश्नाला उत्तर म्हणून आपल्या सरकारने एक त्यांच्या सोयीची घोषणा बनवली आहे. ती म्हणजे TINA (There is no alternative) 'ह्याला पर्याय नाही' ही होय. याचाच अर्थ आपण आंतरराष्ट्रीय संस्थांच्या हातातील बाहुले बनण्याला पर्याय नाही.

गरिबांची पिळवणूक व दारिद्र्य दूर करावे यासाठी आपल्यापैकी काही कार्यकर्ते-गट आटोकाट प्रयत्न करीत आहेत. काही प्रकारची पिळवणूक व गरिबी भारतात सर्वत्र आहे, परंतु काही प्रकारची पिळवणूक व त्यामुळे निर्माण होणारी गरिबी ही वेगवेगळ्या भागांत वेगवेगळ्या स्वरूपाची आहे. हे कार्यकर्ते गट ही आपापल्या भागापुरतेच लक्ष घालत आहेत, अर्थात कधीकधी हे सर्व गट एकत्र येऊन विचारविनिमय करतात हे खरे आहे. परंतु हा फायदा काही विषयांपुरता व काही कार्यक्रमांपुरता मर्यादित राहतो. त्यामुळे मध्यवर्ती सरकारला तो मोठ्या प्रमाणात धक्का पोचवू शकत नाही. तसेच हे जे थोडेफार यश त्यांना मिळते ते ठरावीक (specific) आर्थिक प्रश्नांपुरते मर्यादित राहते. राजकीय व सामाजिक प्रश्नांना ते यश मिळू शकत नाही. त्यामुळे ज्यांच्या हातात सत्ता आहे ते सत्ताधारी निर्धास्त असतात.

(सध्या आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, हे आव्हान मूलतः राजकीय आहे. या देशातील गरीब, निर्वासित, पिळले जाणारे हे सर्वजण एकत्र येऊन सत्ताधारी पक्षांशी मुकाबला करू शकतील का? तसेच ज्यांचा सध्याच्या व्यवस्थेपासून फायदा आहे त्या प्रबळ गटांना नाऊमेद करू शकतील का? पुढे जाऊन आपल्याला हे देखील बघावे लागेल की, ही पिळवणूक सहन करणारे लोक इतके प्रबळ होऊ शकतील का? ते सध्याच्या सत्ताधिशांच्या हातातील सत्ता हिसकावून घेऊ शकतील का? आपला समाज अधिक न्याय व समतेला प्राधान्य देणारा असावा यासाठी हे गट स्वतःची ताकद वाढवू शकतील का?)

सध्याची राजकीय परिस्थीती अशी आहे की, या देशात दोनच पक्ष प्रबळ आहेत. एक म्हणजे काँग्रेस व दुसरा भाजप. त्यामुळे काँग्रेस अधिकारावर आली काय किंवा भाजप अधिकारावर आला काय, त्यात फारसा फरक पडत नाही. सरकार आणि सामान्य जनता यांचे नाते जैसे थे च राहते. आजची आपली अर्थव्यवस्था उदारीकरण आणि खाजगीकरण मुक्त व्यापार यांना मान्यता देत आहे. ही व्यवस्था सुरुवातीला काँग्रेस पक्षाने आपल्या देशात आणली आणि नंतर आलेल्या भाजपने ही याच धोरणाचा पाठपुरावा केला. या बाबतीत पहिले पाऊल राजीव गांधी पंतप्रधान असताना टाकलं गेलं. त्यावेळी राजीव गांधी सरकारात अर्थमंत्री असलेले व्ही.पी. सिंग यांनी त्या प्रयत्नात राजीव गांधींना मदत केली. त्यांनी आयात धोरण पहिल्यापेक्षा अधिक उदार केले. आयात होणाऱ्या मालावरील control कमी केला, तसेच direct व indirect taxes कमी केले. त्यामुळे या देशातील श्रीमंतांचा फायदा झाला. परंतु त्यामुळे आपली foreign exchange पद्धतीही धोक्यात आली. १९९० पासून या देशात याशिवाय पर्याय नाही ' TINA ' हे घोषवाक्य ठरले. आणि त्यावेळी नरसिंहराव सत्तेवर होते. त्या आपल्या देशात आज जाणवणारे दुष्परिणाम केवळ 'जागतिकीकरणावर' अवलंबून आहेत असे नाही.

आज आपल्यापुढे जे आव्हान आहे त्याला तोंड देण्यास - NAPM - सर्वसामान्य जनतेच्या चळवळींची






राष्ट्रीय आघाडी समर्थ आहे असे मला वाटत नाही. कारण ही आघाडी प्रामुख्याने लोकांच्या आर्थिक पिळवणुकीवर व काही प्रश्नांवर विचार करते व त्यानुसार चळवळही करते. आजच्या राजकारणाची स्थिती कशी बदलावयाची ह्याचा विचार ही चळवळ करते असे मला वाटत नाही. जरी त्यांनी तसा विचार केला तरी देखील देशातील ज्या ज्या भागात ही चळवळ कार्यरत आहे, त्य त्या भागातील राजकीय पक्ष सौम्य धोरण स्वीकारतील असे वाटत नाही. देशातील निरनिराळ्या भागांतील सत्ता साधारणतः एकतर, त्या राज्याचे सरकार किंवा त्या राज्यातील नोकरशाही, किंवा त्या भागातील राजकारणी लोक, मोठमोठे जमीनदार, वजनदार व्यापारी, नाहीतर स्थानिक गुंड यांच्या हातात असते. आणि या सर्वांचे एकमेकात साटेलोटे असते. याशिवाय असेही असू शकते की, NAPM च्या सर्वच आघाड्यांचे एकच धोरण (common strategy), तसेच एकच कार्यपद्धती व समान ध्येये असतातच असे नाही.

माझ्या मते NAPM - 'सर्वसामान्य जनतेच्या चळवळींची राष्ट्रीय आघाडी'च्या ऐवजी 'लोकांची चळवळ' A Peoples' Movement - सुरू केली पाहिजे. ह्या चळवळीची राजकीय उद्दिष्टे स्पष्ट असणे जरूर आहे, तसेच सगळीकडे लोकांमध्ये करावयाची जागृती, आणि त्याची पद्धती ही समान स्वरूपाची असण्याची गरज आहे. याचा अर्थ असा नाही की, सध्या या चळवळीचे चालू असलेले आर्थिक प्रश्नांबाबतचे प्रयत्न, जे केवळ चळवळीच्या स्वरूपातच नाहीत, परंतु सर्वसामान्य जनतेचा आर्थिक विकास करण्याचे कार्यक्रमही राबविले जातात, अशा स्वरूपाचेही आहेत हे मला मान्य नाही. ते चांगलेच आहेत, कारण त्यामुळे त्या त्या भागातील लोकांची दारिद्र्य आणि पिळवणूक यांच्यापासून सुटका होत आहे. अशा स्वरूपाच्या मूलभूत कार्यांतूनच लोकांची शक्ती वाढत असते यात शंका नाही. तरीदेखील या चळवळीच्या कार्यकर्त्यांच्या मनात हे स्वच्छपणे असले पाहिजे की, या चळवळी आपल्याला शक्ती मिळवून देतात, आणि ती शक्ती आपण सर्वसामान्य जनतेच्या विरोधात असलेली सत्ता उलथून टाकण्यासाठी वापरली पाहिजे. आणि यासाठी आपल्याला सत्ता काबीज करणे जरूर आहे.

आज अशी स्थिती आहे, की NAPM चे कार्यकर्ते आपण राजकारणात शिरावे की नाही, याबाबत निश्चित नाहीत. हे आपण समजू शकतो. याचे प्रमुख कारण म्हणजे आजकालचे राजकारण हे भ्रष्टाचाराने बरबटलेले आहे. एवढेच नव्हे तर त्यात प्रत्यक्ष गुन्हेगार, आपमतलबी आणि जातीयवादी लोकांचा भरपूर भरणा झालेला आहे. त्या लोकांना फक्त सत्तास्थाने हवी आहेत आणि ती केवळ राजकीय क्षेत्रातीलच नव्हे तर कारखानदारीं, सहकारी संस्था, बँका वगैरेंतही हवी आहेत. आजच्या अशा घाणेरड्या पक्षीय राजकारणात उतरण्यापेक्षा त्यापासून बाजूला राहून सर्वसामान्य जनतेच्या विविध प्रश्नांबाबत चळवळ करणे अधिक योग्य ठरेल. त्यांना हे जरूर समजते की, राजकारण इतके घाणेरड्या स्वरूपाचे असणे जरूर नाही. राजकारण अधिक शुद्ध स्वरूपात करता येईल आणि ही स्वच्छता केवळ चळवळ करणाऱ्या गटांच्या हातात सत्ता यावी यासाठी नसेल. राजकीय क्षेत्र, किंबहुना सर्व समाजाचे शुद्धीकरण करण्यासाठीच असेल.

राजकीय क्षेत्रात उतरावयाचे नाही, असे ठरविलेल्या चळवळीतील कार्यकर्ते, थोड्याबहुत प्रकाराने तशाच स्वरूपाचे काम करीत असलेल्या गटांबरोबरही हातमिळवणी करावयास तयार होत नाहीत. जरी ते समान स्वरूपाचे कार्यक्रम राबवीत असले, तरीही हे गट इतर गटांपासून दूर राहतात. त्यामुळे या सर्वांच्या कार्यक्रमांची बेटे तयार होतात आणि ती विस्कळीत असल्यामुळे एकत्र येऊन काम करू शकत नाहीत.

माझ्या मते, हे सर्व गट एकत्रित येऊन त्यांनी एक मोठी चळवळ केली पाहिजे. त्यासाठी त्यांच्या वैचारिक बैठकी झाल्या पाहिजेत. त्या बैठकांतून समान कार्यक्रम निश्चित करून त्यानुसार आखणी केली गेली पाहिजे. एक सर्व गटांना मान्य असणारे ध्येय, धोरण व कार्यक्रम कार्यरत झाले पाहिजेत. हे ध्येय, धोरण आणि कार्यक्रम अर्थात राजकीय स्वरूपाचाच असणार. परंतु ते कार्यक्रम सर्वसामान्य जनतेच्या एकजुटीसाठीच्या प्रयत्नात पुढाकार घेणारे असणे जरूर आहे. अशी एकजूट जर फार मोठ्या प्रमाणात होऊ शकली तर सामान्य जनतेची आज चाललेली पिळवणूक व त्यांच्यावर होणारे अन्याय रोखू शकेल. त्याही पुढे जाऊन या एकजुटीद्वारे राष्ट्रातील भ्रष्टाचारी राजकीय सत्तेला, आणि सर्वसामान्य जनतेच्या प्रश्नांकडे दुर्लक्ष करणाऱ्या सत्तेला, सामोरे जाऊ शकेल.

आजकाल 'जल, जंगल आणि जमीन' या घोषणा





वारंवार ऐकू येतात. परंतु या तिन्ही बाबतीतील प्रश्न चर्चासत्रे, शिबिरे घेऊन सोडविता येणे शक्य नाही. कारण हे प्रश्न म्हणजे खोलवर रुजलेल्या रोगाची वर वर दिसणारी लक्षणे आहेत. राजकीय क्षेत्रातील सत्ताधीश व आर्थिक क्षेत्रातील सत्ताधीश हे या रोगाच्या मुळाशी आहेत. ते सर्वसामान्य जनतेला 'जल, जंगल व जमीन' यांपासून हटवू पाहत आहेत. यात सर्वात तळाशी असणारे गोरगरीब सर्वात जास्त गाळात रुतत आहेत. हे लक्षात घेऊन हा लढा आपण कसा द्यावयाचा ते ठरविणे आज गरजेचे आहे. आणि यासाठी भरपूर काथ्याकूट करावा लागणार आहे.

या चळवळीचे मुख्य ध्येय अर्थात 'समाजवादाची स्थापना' हे असले पाहिजे. अर्थात येथे समाजवाद हा शब्द महत्त्वाचा नाही. परंतु तरीही समाजवादाची मूलभूत तत्त्वे विचारात घेणे आवश्यक आहे. गेल्या शतकातील 'समाजवादा' पेक्षा एकविसाव्या शतकातील 'समाजवाद' वेगळ्या स्वरूपाचा असू शकेल. परंतु, तरीही त्या दोन्हीमध्ये साम्यस्थळे अधिक असतील. यासाठी राष्ट्रातील सर्व चळवळ करणाऱ्या गटांनी एकत्रित येणे अत्यंत जरूर आहे. N.A.P.M. मध्ये सामील नसलेल्या गटांनीही यात भाग घेणे महत्त्वाचे आहे असे मला वाटते.

या देशात जी दुरवस्था व पिळवणूक ज्यांना सहन करावी लागते, त्या दुरवस्थेचे व पिळवणुकीचे एकमेव कारण म्हणजे 'जागतिकीकरण' नाही. हे लक्षात घेतले पाहिजे. अर्थात, हे मान्यच केले पाहिजे की, प्रगत राष्ट्रे, आपल्या सारख्या दुसऱ्या वा तिसऱ्या जगातील राष्ट्रांवर अतिक्रमण करीत आहेत. स्वतःच्या स्वार्थासाठी त्यांना इतर सर्व राष्ट्रातील अर्थव्यवस्था ताब्यात घ्यावयाची आहे. परंतु आपली मुख्य व्यथा वेगळीच आहे. ती म्हणजे हा स्वार्थ लक्षात येऊनसुद्धा आपले सत्ताधीश, कारखानदार आणि वरीष्ठ मध्यम वर्ग या प्रगत राष्ट्रांचे स्वागत करीत आहे.

आणखी एक मुद्दा म्हणजे 'जागतिकीकरणाला विरोध', म्हणजे आपल्या राष्ट्राचे जगातील इतर सर्व राष्ट्रांशी असलेले संबंध तोडणे असे नाही. जे संबंध सर्वसामान्य जनतेला हितकारक नाहीत ते तोडले पाहिजेत. परंतु जे हितकारक आहेत ते आपण तोडता कामा नये.

आज लॅटिन अमेरिकन राष्ट्रात याच स्वरूपाचे प्रश्न उभे राहिले आहेत. अमेरिकन आंतरराष्ट्रीय उद्योगधंदे, अमेरिकन बँका आणि अमेरिकन राष्ट्र, या राष्ट्रांतील चालू उद्योगधंद्यांचे त्यात गुंतलेले हितसंबंध व हितसंबंधी वर्ग या सर्वांनी मिळून या दक्षिण अमेरिकेतील राष्ट्रांची लूटमार केलेली आहे. आणि त्यांना बिकट परिस्थितीत टाकले आहे. त्यामुळे त्यांतील काहींची आर्थिक अवस्था ढासळून पडलेली आहे. याचे प्रमुख उदाहरण म्हणजे 'अर्जेंटिना' हे राष्ट्र होय. काही वर्षांपूर्वी हे राष्ट्र भरभराटीला आले होते. परंतु सध्या या राष्ट्राची आर्थिक दुरावस्था झाली आहे.

या सर्वांतील लक्षणीय गोष्ट म्हणजे अर्जेंटिना व इतर दक्षिण अमेरिकेतील राष्ट्रांनी मुकाट्याने ही सर्व पिळवणूक सहन करण्यास नकार दिला आहे. आणि आपल्या देशातील सत्ताधीश व अमेरिकेतील सत्ताधीश यांना धडा शिकविण्याचा चंग बांधला आहे. आणि या प्रयत्नात ते यशस्वीही झाले आहेत. सर्वसामान्य जनतेला मान्य असणाऱ्या नेत्यांना सत्तास्थानी बसविण्यास यशस्वी झाले आहेत. सर्वसामान्य जनतेने एकजूट केल्यावर देशात काय घडू शकते ते त्यांनी दाखवून दिले आहे. म्हणून दक्षिण अमेरिकेतील देशांकडून आपल्याला बरेच काही शिकण्यासारखे आहे. त्यासाठी राजकीय, आर्थिक व सामाजिक क्षेत्रात आपण आपल्या देशांत बदल घडवून आणणे अगत्याचे आहे.

✠ ✠ ✠

विश्वविख्यात अर्थशास्त्रज्ञ केन्स सुमारे पाऊणशे वर्षांपूर्वी म्हणाला होता, "उत्पादन वाढेल, उत्पन्न वाढेल, क्रयशक्ती वाढेल. नवी मागणी निर्माण होईल, नवे उद्योगव्यवसाय वाढतील आणि शेवटी सर्व काही ठीकठाक होईल हा अर्थशास्त्रज्ञांचा एक आवडता आणि सतत मांडला जाणारा सिद्धांत आहे. ['In the long run everything shall be all right.'] होय, हे खरे आहे. परंतु केन्स लगेच पुढे म्हणतो - 'But in the long run all of us shall be dead.' [पण त्या 'शेवटी'च्या आधी आपणा सर्वांचाही शेवट झालेला असेल, त्याचे काय?]

# भारतीय समाजवाद्यांपुढील आव्हाने

बगाराम तुळपुळे

(लेखांक : ३)

या वर्षाच्या सुरुवातीला 'समाजवादी आघाडी' - Socialist Front - स्थापन झाली. त्यात अनेक वयोवृद्ध आणि वयस्कर लोक - पूर्वाश्रमीचे समाजवादी - सामील झाले. त्यामुळे या 'आघाडी'ला संघटनात्मक रूप देण्याचे प्रयत्न सुरू झाले. परंतु समाजवाद्यांसमोरील हे एक फार मोठे आव्हान आहे. या आव्हानासमोरील काही प्रश्नांकडे लक्ष वेधण्यासाठी म्हणून या लेखाचा प्रपंच.

'समाजवाद' हे एक तत्त्वज्ञान आहे. तसेच ही एक चळवळही आहे आणि ती एक संघटनाही आहे. या संघटनेत प्रत्येक पाऊल कसे टाकावयाचे याचा सदोदित विचार करावा लागतो. आणि त्या विचारानुसार आचारही करावा लागतो. असा विचार व आचार सर्व समाजवाद्यांनी सर्व पातळीवर करावा लागतो. अर्थात, याची मुख्य जबाबदारी संघटनेच्या पुढाऱ्यांवर असते. मला अशी शंका आहे की, वयोवृद्ध समाजवादी हे पुढारीपणाचे आव्हान कितपत सांभाळू शकतील? त्यांची शारीरिक व मानसिक स्थिती पुढे ठाकणाऱ्या अवघड प्रश्नांना सामोरे जाण्याइतकी टिकून असेल का?

त्याचप्रमाणे गेल्या तीसपस्तीस वर्षांच्या कालखंडात समाजवादी संघटना प्रबल स्वरूपात राहिली नव्हती. समाजवाद्यांपैकी बरेचसे पुढारी वेगवेगळ्या क्षेत्रांत आणि विषेशतः राजकीय सत्ता हस्तगत करण्यात गढून गेले होते. समाजवादाच्या तत्त्वज्ञानाविषयी त्यांना फारसा रस राहिला नव्हता. इथे मला असे म्हणावयाचे नाही की, त्यांनी केलेले कार्य महत्त्वाचे नव्हते, किंवा त्यांनी स्वीकारलेल्या जबाबदाऱ्या (निदान त्यातील काही जणांनी तरी) कमी महत्त्वाच्या होत्या. आता आपल्यापुढील प्रश्न वेगळा आहे :

आता कार्यरत असणारे समाजवादी संघटनेतील इतर कार्यकर्त्यांना परिणामकारक (effective) पुढारीपण देऊ शकतील काय? कल्पनाशक्ती, वैचारिक प्रगल्भता, संघटना बांधणी आणि चळवळींचे नियोजन या सर्वांमध्ये जी झोकून देण्याची वृत्ती अभिप्रेत आहे, ती स्वतःच्या उदाहरणाने इतर कार्यकर्त्यांना प्रोत्साहित करू शकण्याएवढी आहे का? याचा विचार केला असताना, पुरेशी शक्ती, उत्साह, पूर्ण विचारांती निर्णय घेण्याची क्षमता, आणि समाजात आपल्या कार्याने मिळवलेले मानाचे स्थान असणारे पुढारी दिसत नाहीत.

तत्त्वज्ञान (Idealogy) नक्की करणे हे पहिले व महत्त्वाचे काम आहे. मी पुस्तकी तत्त्वज्ञानाला चिकटून राहत आहे, असे वाटले तरीही मला असे ठासून म्हणावयाचे आहे की, 'समाजवादी तत्त्वज्ञानाचा प्रथम, तपशीलात विचार होणे जरूर आहे. आपली मूलभूत तत्त्वे समजावून घेणे आणि त्यानुसार आखलेल्या कार्यक्रमांचे नियोजन करणे हे सर्वात महत्त्वाचे आहे. हे मूलभूत तत्त्वज्ञान व त्यानुसार व्यक्तींचे व गटांचे वर्तन व कार्यक्रम सुसंगत नसतील, तर समाजवादी विचारसरणी मानणारे सर्वसामान्य कार्यकर्ते देशातील इतर दबावांना बळी पडण्याची शक्यता आहे. कारण, इतर तत्त्वज्ञाने, त्यांचे भुरळ पाडणारे कार्यक्रम यांना बळी पडून राजकारणातील सत्तास्थाने, पैसा, जातीय व प्रादेशिक मान्यता मिळवण्यासाठीचा मोह प्रबळ होऊ शकेल.

पूर्वीच्या आपल्या 'समाजवादी पक्षा'ची अवस्था काय झाली? आपल्या मूलभूत तत्त्वांवरील अढळ विश्वास, आणि त्यानुसार कार्यक्रम व वर्तन न झाल्यामुळेच पूर्वीच्या 'समाजवादी पक्षांचे विघटन झाले. जयप्रकाश नारायण, आचार्य नरेंद्र देव, राममनोहर लोहिया, अच्युत पटवर्धन, अरुणा असफअली, अशोक मेहता, एस.एम. जोशी १९४२ सालच्या 'चलेजाव' चळवळीनंतर एकत्र आले होते. आणि त्यांनी समाजवादी तत्त्वांची व ध्येयधोरणांची सखोल विचारांती मांडणी केली होती. त्यातूनच त्यावेळेची 'समाजवादी पक्षा'ची स्थापना झाली होती. आमच्यासारख्या नवीनच सामील होणाऱ्या तरुणांनी ही मूलभूत तत्त्वे मनःपूर्वक स्वीकारली होती. आता हा पक्ष कामगार व शेतमजूर यांच्यासारख्या या देशातील असंख्य कर्मचाऱ्यांना प्रयत्नपूर्वक एकत्रित करून देशात समजावादी विचारसरणी रुजविण्यास तयार करतील, असा आम्हा तरुणांचा विश्वास होता.

परंतु केवळ तीन-चार वर्षातच अरुणा असफअली











अनुक्रमणिका

समाजवादी पक्षातून बाहेर पडून साम्यवादी पक्षात गेल्या, कारण ती विचारसरणी त्यांना अधिक क्रांतिकारी वाटली. नंतर अच्युत पटवर्धन पक्षत्याग करून जे. कृष्णमूर्तींच्या तत्त्वज्ञानाकडे वळले. १९५२ सालच्या सार्वजनिक निवडणुकांत दारूण पराभव स्वीकारावा लागला. नंतर अशोक मेहता सत्ताधारी काँग्रेस पक्षात शिरले. त्याविषयी त्यांची कारणे म्हणजे, देशातील मागास अर्थव्यवस्था व त्यामुळे निर्माण होणारी राजकीय परिस्थिती (political compulsions of a backward economy) ही होती. तसेच त्यांचे म्हणणे असे होते की, सत्ताधारी पक्षाशी जवळीक साधून जे साध्य होईल (areas of agreement) ते साध्य करून घ्यावे.

१९५२ च्या निवडणुकांतील दारूण पराभवाचा आणखी एक परिणाम झाला. समाजवादी पक्षाने 'किसान मजदूर प्रजा पार्टी'शी स्वतःला जोडून घेतले. हा पक्ष आचार्य कृपलानी यांनी स्थापन केला होता. आणि या पक्षाचे ध्येयधोरण 'समाजवादी पक्षा'च्या ध्येय-धोरणाशी पूर्णतः सुसंवादी नव्हते. यांतून एक नवीन पक्ष जन्माला आला, तो म्हणजे 'प्रजा समाजवादी पक्ष'. थोड्याच काळानंतर डॉ. राममनोहर लोहिया यांनी 'प्रजा समाजवादी पक्षा'तील काही कार्यकर्ते व पुढारी फारच मवाळ (paralysed) आहेत असे जाहीर करून टाकले. परिणामतः डॉ. लोहियांनी 'प्रजा समाजादी पक्ष' सोडला आणि परत पूर्वीच्या 'समाजवादी पक्षा'ची स्थापना केली. डॉ. लोहियांच्या मागोमाग प्रजा-समाजवादी पक्षाचे काही कार्यकर्तेही गेले. परंतु सर्वांत मोठा धक्का समाजवादी पक्षाला बसला, तो जयप्रकाश नारायण, देशातील सर्वत्र मान्यता पावलेले, विरोधी पक्षातील लोकांनाही आदरणीय व विश्वासू नेते समाजवादी पक्ष सोडून गेले तेव्हा. ते विनोबा भाव्यांनी नुकत्याच सुरू केलेल्या भूदान चळवळीत सामील झाले आणि त्या चळवळीसाठी त्यांनी जीवनदान दिले. त्यानंतर अनेक वर्षे गेल्यावर व पुलाखालून पुष्कळ पाणी वाहून गेल्यावर, त्यांच्या पुन्हा लक्षात आले की, प्रचंड मोठ्या प्रमाणावर सर्वसामान्य जनतेची चळवळ उभी राहिल्याखेरीज देशात चालू असलेल्या पिळवणुकीला व दडपशाहीला आळा बसणार नाही. आणि ही चळवळ देशातील आर्थिक व सामाजिक परिवर्तनासाठी सुरू करणे जरूर आहे. जयप्रकाश नारायणांची नवीन घोषणा 'संपूर्ण क्रांती' देशभर गाजली. आणि १९७० ते १९७५ च्या कालखंडात तरुणांत, त्यांच्या प्रश्नांचे गांभीर्य लक्षात घेऊन, जागृती करण्यात महत्त्वाची ठरली. परंतु 'संपूर्ण क्रांती'चे स्वप्न प्रत्यक्षात उतरविणे सहजसाध्य नव्हते. कारण समाजवादी पक्षातील निष्ठावान व प्रामाणिक कार्यकर्ते निरनिराळ्या क्षेत्रात विखुरले गेले होते. त्याचप्रमाणे 'संपूर्ण क्रांती' या घोषणेमागील तत्त्वज्ञान, चळवळीत नव्याने सामील झालेल्या तरुणांना पूर्णपणे आकलन झालेले नव्हते. ते केवळ जयप्रकाश नारायणांच्या त्यागमय जीवनामुळे प्रभावित झालेले होते. १९७५ साली 'आणीबाणी' घोषित करून इंदिरा गांधींनी सर्व सत्ता स्वतःच्या हातात एकवटली. 'आणीबाणी' विरुद्ध उठलेल्या जनसंग्रामात समाजवादी पक्षातील कार्यकर्त्यांनी हिरीरीने भाग घेतला व अनेकांनी तुरुंगवास पत्करला. 'आणीबाणी' विरुद्ध देशभर उसळलेल्या चळवळींतून 'जनता पक्षा' ची स्थापना झाली. त्यात समाजवादी कार्यकर्ते मोठ्या संख्येने सामील झाले. परंतु 'जनता पक्ष' अंतर्गत दुहीमुळे लवकरच फुटला. त्यानंतरच्या कालखंडात 'समाजवादी पक्ष' केवळ नावापुरताच राहिला.

हा सर्व इतिहास मांडताना मला आवर्जून हे सांगावयाचे आहे की, आणीबाणी विरुद्ध उठलेल्या जनक्षोभात जे समाजवादी कार्यकर्ते सामील झाले होते, ते अतिशय प्रामाणिक होते. ते स्वतःसाठी किंवा स्वतःच्या शिष्यांसाठी पदांचा लोभ करीत नव्हते. स्वतःसाठी प्रसिद्धी मिळविण्यासाठीही ते धडपडत नव्हते. मला इतकेच म्हणावयाचे आहे की, तत्त्वज्ञान, त्याच्याशी सुसंगत ध्येय व धोरणे जी ठरविण्याच्या कामात त्यांनी प्रामुख्याने भाग घेतला होता, ते तत्त्वज्ञान व ध्येयधोरणे ही त्यांच्या दहा वर्षांपूर्वी मांडणी केलेल्या तत्त्वज्ञानाशी सुसंगत नव्हते.

आज जे सामजवादी विचारवंत समाजवादाच्या तत्त्वज्ञानाचे देशात पुनरुत्थापन करू इच्छित आहेत, त्यांनी खालील महत्त्वाच्या पायाभरणीचा सखोल विचार करणे जरूर आहे. आज, आर्थिक, राजकीय व सामाजिक घडामोडी जगभरातच अत्यंत वेगाने होत आहेत. जगभरातील सर्वच राष्ट्रांत जागतिकीकरण, भांडवलशाही आणि नवसाम्राज्यवाद (neo-imperialism) महत्त्वाचे बदल घडवून आणत आहेत. अशा वेळी पूर्वीच्या काळातील समाजवादी धोरणे व तत्त्वज्ञान या बदलांशी सामना करू शकेल काय? आजच्या काळात समाजवादाची घोषणा तरुणांना तर प्रोत्साहित करू शकणार नाही, परंतु देशभरातील गरीब, कष्टकरी, पिळली जाणारी सर्वसामान्य जनता, यांनाही एकत्र आणू शकणार नाही. आज, अनेक तरुण, ध्येयवादी कार्यकर्ते आपापल्या

अनुक्रमणिका

ठिकाणी कार्यरत आहेत. परंतु त्यांना समाजवादाच्या तत्त्वज्ञानाचे आकर्षण वाटते का? ते निरनिराळ्या चळवळी करताना जरूर समाजवाद्यांशी हातमिळवणी करतात, परंतु केवळ 'समाजवाद' आणावयाचा असे म्हटले की, समाजातील पिळवणूक सहन करणारी कष्टकरी जनता आपल्या पाठीमागे जरूर येईल? तसे होईल असे मला वाटत नाही.

आजच्या काळात समाजवादाचे स्वरूप कसे असावे हे विषद करून सांगण्याइतका मी विद्वान आहे असे मला वाटत नाही. तसंच, या लेखात ते करणेही शक्य नाही. परंतु काही विशिष्ठ क्षेत्रात लक्ष घालून आपण त्या क्षेत्रांचा सखोल अभ्यास करणे आणि त्या क्षेत्रातील प्रश्नांचे स्वरूप समजून घेमे अवश्य आहे असे मला वाटते.

पहिला महत्त्वाचा मुद्दा म्हणजे आजच्या भांडवलशाहीचे स्वरूप वेगळे आहे काय याचा विचार झाला पाहिजे. आज, जी पिळवणूक करण्याची आणि हिसकावून घेण्याची वृत्ती वाढीस लागली आहे, त्याचे निश्चित स्वरूप काय? भारताच्या बाबतीत ह्या प्रश्नाचा कसा विचार केला पाहिजे? याविरुद्ध लढा उभारताना, पूर्वीच्या विचारवंतांप्रमाणे कामगार वर्ग या लढ्यात पुढाकार घेईल असे मानता येईल का?

आजच्या काळात तिसऱ्या जगातील संपत्ती, आणि बुद्धिमत्ता लुटून नेली जात आहे. नैसर्गिक संपत्तीचा ऱ्हास केला जात आहे. सर्वत्र प्रदूषण माजले आहे. त्यामुळे तिसऱ्या जगातील जलसंपदा, भूमिसंपदा, अन्नधान्याची निर्मिती वगैरे सारखे प्रश्न आज आपल्यासमोर उभे ठाकले आहेत. या सर्व प्रश्नांचा समाजवादी तत्त्वज्ञानाला अनुसरून विचार केला पाहिजे. या आपल्या राष्ट्रीय आणि जागतिक स्वरूपाच्या प्रश्नांना आव्हान देणारे मार्ग शोधून, त्याप्रमाणे संघटना बांधली पाहिजे.

भारतासमोर व इतरत्रही आणखी एक प्रश्न उभा आहे. तो म्हणजे जमातवाद. (Communalism) भारतात हिंदु जमातवाद बळकट होऊ लागला आहे. समाजवादाच्या पूर्णतः विरोधी अशी ही विचारधारा आहे. या विचारधारेमुळे राष्ट्रीय एकात्मतेवर फार मोठा आघात होत आहे. या सर्व प्रश्नांचा सखोल विचार करून नंतरच समाजवादी विचारधारेनी कृति केली पाहिजे.

आपल्या राष्ट्रात दलित आणि आदिवासी हे सर्वात दरिद्री, पिळले जाणारे आणि दबून राहणारे लोक आहेत. या लोकांची पिळवणूक थांबविणे आणि दारिद्र्य नाहीसे करण्यासाठी प्रयत्न करणे हे आज समाजवादासमोरील सर्वात मोठे आव्हान आहे. समाजवाद्यांनी आजपर्यंत याविषयी फारसा विचार केला नव्हता हे मान्य करावयास हवे. त्यांना वर्गलढा अधिक महत्त्वाचा वाटत होता. आजच्या समाजवादी विचारसरणीला या दलित आणि आदिवासींच्या समस्या समजावून घेऊन त्या सोडविण्याठी प्रयत्न करणे हे सर्वप्रथम ध्येय असले पाहिजे. तरच हे तळागाळातील लोक आपल्या पाठीशी उभे राहतील.

गेल्या वीस वर्षात दलितांच्या प्रश्नांत (discourse) बरेच फरक होत आहेत आणि समाजवाद्यांनी या फरकाचा सखोल अभ्यास केला पाहिजे. आज दलित आपले हक्क मिळवण्यासाठी लढत आहेत, आणि त्यांच्यामधून दलित-पुढारी निर्माण होत आहेत. हे पुढारी सुशिक्षित, विद्यासंपन्न आहेत आणि आपल्या प्रश्नांकडे आणि परिस्थितीकडे लक्ष देऊन ती बदलण्यासाठी कार्य करीत आहेत. त्यांच्यातील आत्मविश्वास जागा झाला आहे. आणि लढाऊ भूमिका ते स्वीकारू लागले आहेत. ते असा दावा करताहेत की, दलित किंवा आदिवासी वरीष्ठ वर्णियांपेक्षा कमी प्रतीचे नाहीत. ते देखील उत्तम शिक्षण घेऊ शकतात, आणि त्यांची विविध वस्तूंची उत्पादनक्षमता चांगली आहे. आज ते वरीष्ठ वर्णीयांसमोर भीक मागत नाहीत किंवा आमच्यावर कृपा करा असे म्हणत नाही. त्याचप्रमाणे वरीष्ठ वर्णीयांना 'आपले आदर्श' म्हणून जाणत नाहीत. त्यांचे आदर्श आणि पुढारीसुद्धा डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे आहेत. अर्थात डॉ. बाबासाहेब आंबेडकर हयात असतानाही त्यांचे आदर्श पुरुषच होते.

१२ व १३ जानेवारी २००२ साली भोपाळ येथे दलित विचारवंत आणि दलित कार्यकर्ते यांची एक परिषद झाली. ही परिषद मध्यप्रदेश सरकारच्या पुरस्कारामुळे (sponsorship) घेणे शक्य झाले. ही परिषद म्हणजे दलितांच्या चळवळींच्या बाबतीत एक मैलाचा दगड (landmark) होता. या परिषदेच्या शेवटच्या दिवशी एकवीस मुद्दे मांडले गेले. तसेच एक preamble ही सादर करण्यात आले. या preamble मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी पुरस्कार केलेल्या लोकशाही समाजवादाला मान्यता दिलेली आहे, तसेच त्यांचे जे एक प्रमुख मागणे होते की, राजकीय लोकशाहीमधील समाजात देखील सर्वत्र लोकशाहीच असली पाहिजे. म्हणजेच, केवळ राजकीय क्षेत्रात लोकशाही पुरेशी नाही, सामाजिक व आर्थिक क्षेत्रातही ती

अनुक्रमणिका

असणे जरूर आहे. या जाहीरनाम्यानुसार, आपल्या राज्य-घटनेत नमूद केल्याप्रमणेच समाजरचना असावी, असे अभिप्रेत आहे. म्हणजे, स्वातंत्र्य, समता व बंधुता ही आपली ध्येयेच त्यात मांडली आहेत. या जाहीरनाम्यात पुढे असेही नमूद केले आहे की, दलितांनी एकत्रितपणे जे समाजातील व परदेशातील व्यक्तिस्वातंत्र्य व सामाजिक समता आणण्यासाठी झटत आहेत, त्यांच्याशी हातमिळवणी करणे जरूर आहे. डॉ. बाबासाहेबांनी सांगितल्याप्रमाणे, आपल्या चळवळी राज्य-घटनेला मानून लोकशाही पद्धतीनेच चालविल्या पाहिजेत. या जाहीरनाम्यात इतरही काही महत्त्वपूर्ण मुद्दे मांडले आहेत. ते खालीलप्रमाणे आहेत.

डॉ. आंबेडकरांच्या पश्चात् दलित/विचारवंतांनी त्यांची चळवळ योग्य मार्गाने चालविली नाही त्याचप्रमाणे देशभरातील विद्वानांना प्रभावित करणारे नेतृत्व पुढे आले नाही.

आदिवासी जाती-जमातींचे ऐतिहासिक आणि न्याय हक्कांविषयी काहीच विचार झाला नाही. तसेच, आदिवासी स्त्रियांचे, देशातील वैभवशाली परंपरांचा विचारही झाला नाही. आदिवासी जंगलात जे निर्माण होते, त्यावर बहुतांशी निर्वाह करतात. विशेषतः आदिवासी स्त्रिया जंगलातील वनस्पती व वृक्ष यांची व्यवस्थित जोपासना करतात. Bio-diversity आणि natural resources अशा मोठमोठ्या कल्पना माहीत नसतानाही, आपल्या भल्यासाठी हे लोक जंगलाची जोपासना करतात. त्यांच्या प्रश्नांचा अधिक विचार व अभ्यास होणे अत्यंत जरूरीचे आहे.

भारतातील लुबाडले जाणारे जे सर्वसामान्य लोक आहेत, त्या सर्वांची एकजूट करून, त्यांच्या प्रश्नांची सोडवणूक करणे, व त्यांना न्याय मिळवून देणे याकरिता प्रयत्नशील राहण्याची गरज आहे.

ह्या सर्व प्रश्नांशी झगडण्याचे व ते सोडविण्याचे कार्य करण्यासाठी दलित प्रयत्नशील आहेत, परंतु त्यांचे पाठीराखे म्हणून कुठलेच राजकीय पक्ष धोरण ठरविण्याच्या बाबतीत निरुत्साही आहेत.

या परिषदेत असाही ठराव केला गेला की, कायद्याची मदत घेऊन हे प्रश्न सोडविण्याचे प्रयत्न व्हावेत. दलितांची सामाजिक मालमत्ता, वरीष्ठ वर्णीयांनी जुलूमजबरदस्तीने बळकाविलेल्या त्यांच्या जमिनी, दलित शेजमजूरांवर होणारे अत्याचार व अपमानास्पद वर्तणूक या प्रश्नात लक्ष घालणे अत्यंत जरूरीचे आहे.

दलित व आदिवासी स्त्रियांची राखीव जागांविषयी स्वतंत्र category करणे जरूरीचे आहे. भांडवलशाहीत (कारखाने वगैरेत) लोकशाही आणणे अगत्याचे आहे. त्यामुळे दलित आणि आदिवासींना (S.T.S.) स्वतःचे भांडवल घालून निर्मिती प्रक्रियेत सहभाग घेऊ शकतील.

वरील सर्व ठराव, आजच्या काळातील दलितांचे व आदिवासींचे न्याय्य हक्क मांडत आहेत. दलितांचे वर्चस्व नसलेल्या ज्या इतर कार्य करणाऱ्या संघटना आहेत, त्यांचीही भूमिका यापेक्षा वेगळी नाही. नव्याने प्रगट होणारी दलित नेत्यांची विचारसरणी देखील याच विचाराकडे झुकलेली दिसते.

आजच्या समाजवाद्यांनी ह्या बदलत चाललेल्या दलित विचारसरणीकडे लक्ष दिले पाहिजे. आणि दलित-आदिवासींना सकारात्मक व प्रत्यक्ष कृतीत उतरणारा पाठींबा देणे अगत्याचे आहे. हा पाठींबा उपकारकर्त्याच्या भूमिकेतून देता कामा नये. आपण सर्व एकच आहोत, तुमचे आणि आमचे प्रश्न तेच आहेत या भूमिकेतून दिला गेला पाहिजे. आज हा तळा-गाळातल्या, आत्यंतिक पिळवणूक सहन करणाऱ्या लोकांचा आवाज आहे, दबल्या गेलेल्यांचा आवाज आहे. जी संघटना पूर्णपणे या तळागाळातील लोकांच्या प्रश्नांना सर्वात महत्त्वाचे स्थान देत नाही, आणि त्यांना आपल्या व्यथा, आपले प्रश्न जनतेसमोर मांडण्याची संधी देत नाही, ती संघटना समाजवादी असूच शकत नाही.

आजच्या समाजवादाचे स्वरूप मांडताना, दलित आदिवासींचा आवाज मोठ्या प्रमाणात उठविला गेला पाहिजे. त्यासाठी नव्याने निर्माण होणाऱ्या दलित पुढाऱ्यांना आजच्या समाजाच्या विषम पद्धतीवर टीका करण्याची व त्यात बदल सुचविण्याची संधी दिली पाहिजे. आपल्या चळवळीत दलित आदिवासींचा जास्तीत जास्त सहभाग घेतला पाहिजे. हे सर्व सहज साध्य नाही, कारण सवर्णांविषयी अढी व अविश्वास या लोकांत रुतून बसलेला आहे, आणि ते साहजिकच आहे. ही अढी आणि हा अविश्वास दूर करण्यासाठी समाजवाद्यांना झटावे लागेल. त्याखेरीज दोघांमध्ये सुसंवाद निर्माण होऊ शकणार नाही. अर्थात, त्यांच्या बाजूनेही मैत्रीचा हात पुढे येणे जरूर आहे. त्याशिवाय अनेक सामाजिक व आर्थिक प्रश्नांविषयी अर्थपूर्ण व सुसंवादी देवाण-घेवाण निर्माण होऊ शकणार नाही.

आज समाजवादी आघाडीला आपला पाया विस्तृत



अनुक्रमणिका

करण्यासाठी काय करणे जरूर आहे याचा विचार केला पाहिजे. पूर्वीच्या समाजवादी पक्षाशी हातमिळवणी करून आणि आजही जे समाजवादाच्या ध्येय, धोरणांना मानतात त्यांचे सहकार्य घेऊन, राष्ट्रीय पातळीवर समाजवादाचा पाया विस्तृत होणे अवघड आहे. किंबहुना शक्य नाही. तर मग, हा पाया विस्तृत करण्यासाठी समाजवादी आघाडीने कुठली पाऊले उचलावयास हवीत?

आज देशात अनेक पक्ष कार्यरत आहेत. पूर्वीचे साम्यवादी, मार्क्स-लेनिनवादींपासून अनेक गट स्वतःला डाव्या विचारसरणीचे म्हणून घेतात. सोव्हिएट रशियाच्या विघटना नंतर तेथे जे बदल झाले, त्यामुळे डाव्या विचारसरणीच्या पक्षांना, साम्यवादी, मार्क्स-लेनिनवादी वा इतर डाव्या विचार-सरणी असलेल्यांना पूर्वीइतका आपापसात भेदभाव वाटत नाही. हे सर्व पक्ष एकत्रित होतील असे अजून तरी म्हणता येत नाही परंतु आजच्या जागतिकीकरणाच्या परिस्थितीत या सर्व पक्षांच्या कार्यकर्त्यांवर एक प्रकारचा दबाव येत आहे. दुसऱ्या बाजूने, हिंदुत्ववाद्यांचा जोरही वाढत चालला आहे. या दबावांना तोंड देण्यासाठी एक समान कार्यक्रम व त्यानुसार आखलेले धोरण स्वीकारणे जरूर आहे. समाजवादी आघाडीला सर्व डाव्या विचारसरणींच्या पक्षांना एकत्रित करण्यासाठी, एकमेकांशी संबंध वाढविले पाहिजेत.

अलीकडे खेड्यापाड्यांतील रहिवाशांचे प्रश्न सोडविण्यासाठी अनेक गट लहान मोठ्या पातळ्यांवर कार्य करत आहेत. ते केवळ संघर्षात्मक कार्य करीत आहेत असे नाही, तर विधायक कामही करीत आहेत. बहुतेक सर्व कार्यकर्ते एकमेकांशी परिचित आहेत आणि त्यांची धोरणे आणि कार्यपद्धतीही एकमेकांशी मिळतीजुळती आहे. एवढेच नव्हे, तर हे कार्यकर्ते स्थानिक गोरगरीब लोकांशी मैत्रीपूर्ण संबंध ठेवून आहेत. परंतु हे कार्यकर्ते राजकारणात पडत नाहीत. कारण, त्यांना ज्या प्रकारचा संघर्ष करावा लागतो त्यामुळे ते वरीष्ठ वर्गीय, वरीष्ठ वर्णीय आणि नोकरशाहीच्या डोळ्यांत खुपू लागतात. परिणामतः त्यांच्या राजकीय पक्षांशी संबंध येणे अपरिहार्य ठरते. अशा परिस्थितीत एक राजकीय पक्ष स्थापन केल्याखेरीज पर्याय नाही. कारण त्याशिवाय त्यांना करावयाचा असलेला क्रांतिकारी बदल होणे शक्य नाही. अशा पर्यायाला डावी विचारसरणीच स्वीकारावी लागेल. समाजवादी आघाडीला पुढाकार घेऊन राजकीय पक्ष स्थापनेसाठी प्रयत्नशील होणे अत्यंत गरजेचे आहे.

आजपर्यंत 'समाजवादी आघाडी' ही प्रामुख्याने शहरी भागात कार्यरत होती. शहरी कार्यकर्त्यांची छाप या आघाडीवर होती. साठ वर्षांपूर्वीदेखील समाजवादी पक्ष अशाच स्वरूपाचा होता. कदाचित थोडा अधिक ग्रामीण होता. ज्या ज्या शहरात कारखाने आहेत, त्या त्या शहरात समाजवादी विचारसरणीचे कार्यकर्ते तळागाळातील कामगार वर्गातही पसरले होते. आज, शहरात असे कार्यकर्ते फारसे दिसत नाहीत. ट्रेड युनियनची चळवळ देखील, जी एके काळी जोरात काम करीत होती आणि देशभर गाजत होती, ती देखील निष्प्रभ झालेली दिसते. या ट्रेड युनियन चळवळीतही साम्यवादी व समाजवादी कार्यकर्तेच प्रमुख भूमिका निभावत होते. त्यांच्या पाठीमागे अनेक छोटे-मोठे कार्यकर्ते त्यांना मदत करण्यासाठी तयार होते. हे छोटे कार्यकर्ते तळागाळातून आलेले होते.

आजकाल अशा कार्यकर्त्यांचा समूह आणि त्यातून पुढे आलेले पुढारी फारसे दिसत नाहीत. पूर्वी जी ट्रेड युनियन चळवळ जोशात होती, तशी ती आता राहिली नाही. त्या चळवळीत पुढाकार घेणारे समाजवादीही आता दिसत नाहीत. आज देशातील नऊदशांश कामगार असुरक्षित क्षेत्रात काम करीत आहेत. त्यापैकी बरेचसे खेड्यापाड्यातील आहेत व खेड्यांतच काम करीत आहेत. त्यापैकी देखील बरेचसे दलित आणि आदिवासी आहेत. या असुरक्षित क्षेत्रातील कामगारवर्ग सर्वात गरीब, सर्वाधिक पिळला जाणारा आहे. आणि त्यांच्या प्रश्नांसाठी लढणारा क्वचितच कोणी आहे. त्याचप्रमाणे जागतिकीकरणाचे घोर परिणाम या वर्गालाच भोगावे लागत आहेत. या मोठ्या समुदायाला समाजवादी विचारसरणीत मध्यवर्ती स्थान दिले पाहिजे. केवळ विचारसरणीतच नव्हे तर प्रत्यक्ष कृतीत, आणि लढ्यात त्यांना आपल्या बरोबर घेतले पाहिजे.

दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, दलितांच्या चळवळीत जे विखुरलेपण दिसते, ते दूर करून त्यांच्यामध्ये एकजूट करण्यासाठी, त्यांना प्रोत्साहन देऊन, सर्व प्रकारचे पाठबळ दिले पाहिजे.

ह्या विवेचनात मी केवळ मार्ग सुचविलेले आहेत. याविषयी अधिक विचार विचाराधिष्ठित कृती होणे जरूरीचे आहे. कारण या पुढचा आपला मार्ग अधिकाधिक खडतर होत जाणार आहे.

✠ ✠ ✠






# लोकशाही समाजवादी चळवळीत राष्ट्र सेवा दलाचे योगदान

## सुभाष वारे

राष्ट्र सेवा दलाच्या स्थापनेला ६० वर्षे पूर्ण झाली आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळात १९४१ साली राष्ट्र सेवा दलाची स्थापना करण्यात आली आणि राष्ट्र सेवा दल नक्की कशासाठी आहे, हे ठरविणाऱ्यांमध्ये अनेक मान्यवर क्रियाशील विचारवंत कार्यकर्ते सहभागी होते. आणि दीर्घकालीन उद्दिष्टांमध्ये समाजातील शोषित दलित समूहांसहित सर्वांना विकासाची संधी देणारी समतेवर आधारीत अशी लोकशाही समाजवादी समाज-रचना वास्तवात आणण्यासाठी प्रयत्न करणे हे मानले गेले. धर्मनिरपेक्षता, राष्ट्रवाद आणि वैज्ञानिक दृष्टिकोन ही मूल्येही आपल्या पंचसूत्रीवर आधारित ध्येयधोरणात राष्ट्र सेवादलाने त्याच काळात समाविष्ट केलेली दिसतात. तातडीच्या उद्दिष्टाच्या बाबतीत म्हणजेच स्वातंत्र्य चळवळीत त्या काळातील सेवादल सैनिकांनी आपले योगदान अत्यंत निर्भयपणे व समर्थपणे पार पाडले. हा सेवादलाचा गौरवशाली इतिहास आहे; पण या लेखाचा तो विषय नाही, त्यामुळे त्याच्या तपशीलाची इथे गरज नाही.

राष्ट्र सेवादलाच्या दीर्घकालीन उद्दिष्टांबद्दल अगदी सुरुवातीपासून सजग असणाऱ्या नेतृत्वाने त्यासाठी काय कार्यक्रम दिले? लोकशाही समाजवादी समाजरचना अस्तित्वात आणण्यासाठी सेवादलाचे योगदान काय असावे अशी अपेक्षा होती? त्यात किती यश मिळाले? त्याच संदर्भात पुढील वाटचाली बद्दल आज सेवादलाचे काय स्वप्न आहे? याअनुषंगाने मांडणी करावी असा या लेखाचा उद्देश आहे.

मला वाटते राष्ट्र सेवादलाच्या कार्यपद्धतीमध्ये शाखा चालवणे, शाखेवरती विविध सांस्कृतिक आणि क्रीडात्मक उपक्रमांद्वारे कुमार व युवक गटातील मुलामुलींना संघटित करणे आणि त्यातून समाजवादी शीलाचे नागरिक घडवणे हा मुख्य कार्यक्रम मानला गेला. त्याचबरोबर समाजवादी आंदोलनाच्या विविध पैलूंचे भान असणारे आणि त्या अनुषंगाने विविध सामाजिक राजकीय क्षेत्रांत पुढे संघर्ष उभा करणारे, काही रचनात्मक उकप्रम उभारणारे कार्यकर्ते शाखेद्वारे घडविणे याच्यावर भर राहिला. स्वातंत्र्य आंदोलनाच्या गौरवशाली इतिहासाच्या पार्श्वभूमीवर आणि त्या काळातील त्यागमय वातावरणाच्या परिणामाने सुरुवातीच्या काळात राष्ट्र सेवादलाने हे काम जोमाने केले असे दिसते. या पद्धतीच्या कामात राष्ट्र सेवादलाने काय काय चांगले साध्य केले, हे बघतना मला खालील बाबी ठळकपणे नजरेत भरतात.

**सेवादलाचे यश**

१. जातिनिर्मूलन आणि स्त्री-पुरुष समता या बाबतीत १९७० पर्यंत वैयक्तिक आचरणातून आदर्श घालून देण्याच्या बाबतीत फार मोठी मोहीम सेवादलामध्ये चालविली गेली. याच काळात सेवादलाच्या प्रेरणेतून दखल घ्यावी इतके आंतरजातीय विवाह झाले. थोड्या थोड्या प्रमाणात का होईना, सर्व जातीधर्मातील लोक एकमेकांत सरमिसळून सेवादल उपक्रम यशस्वी करताना दिसतात. त्याच्याबरोबर याच काळात दखल घ्यावी या प्रमाणात महिला कार्यकर्त्या सेवादलाच्या माध्यमातून सार्वजनिक जीवनात आलेल्या दिसतात. निर्भयपणे मोकळे-पणाने घराबाहेर पडून, विविध उपक्रमातून सहभागी झालेल्या दिसतात. त्यांच्या पुरुष सहकाऱ्यांनी (वडील, पती) या त्यांच्या भूमिका स्वीकारलेल्या दिसतात. अलीकडील काळात मात्र या दोन्ही बाबतीत फार काही चांगले घडताना दिसत नाही.

२. वैयक्तिक जीवनात साधेपणाने जगणारे, सतत कार्यरत राहणारे म्हणजेच वैयक्तिक आचारसंहितेच्या माध्य-मातून प्रेरणादायी आदर्श घडविणारी अनेक व्यक्तिमत्त्वे अनेक क्षेत्रांत सेवादलाच्या माध्यमातून घडलेली दिसतात. सेवादल सैनिकांच्या विचारांबद्दल मतभेद असतील पण त्यांच्या निष्ठांविषयी शंका विरोधकही घेणार नाहीत. साधे भ्रष्टाचाराचे उदाहरण जरी घेतले तरी बंगारू लक्ष्मणच्या बाबतीत (आणि अन्य कितीतरी आर.एस.एस. च्या स्वयंसेवकांबाबत) स्वयं-सेवक नापास झाल्याची जी कबुली संघप्रमुखांना द्यावी लागली तशी कबुली देण्याची वेळ कुठल्याही सेवादल अध्यक्षांवर कधीही आली नाही आणि भविष्यातही येणार नाही. हे सेवादलाचे फार मोठे यश आहे असे मी मानतो.

३. राष्ट्र सेवादलाचे निधीसंकलन हे सातत्याने छोट्या छोट्या देणग्यांतून सर्वसामान्य जनतेकडून होत राहिल्याने आपोआपच आर्थिक व्यवहाराच्या बाबतीत उत्तरदायित्वाची संकल्पनाही रुजली गेल्याचे दिसते.

४. समाजवादी चळवळीला अभिप्रेत असे विविध सांस्कृतिक उपक्रम सेवादलाने भूतकाळात सातत्याने राबविलेले








दिसतात. त्यांचा जनमानसावर प्रभाव पडला. पण याबाबतीत केंद्रित पद्धतीने भव्यदिव्य आणि महत्त्वाकांक्षी सांस्कृतिक उपक्रमांचे आयोजन करण्यावरच भर राहिल्याचे जाणवते. त्याला बहुजनांच्या सांस्कृतिक चळवळीचे स्वरूप देण्याबद्दल विचार संवादलात झाला नसावा, असे वाटते.

भारतीय समाजावरील कुठल्याही आपत्तीमध्ये किंवा संकटामध्ये संकटग्रस्त लोकांना मदत पुरविणे आणि पुनर्वसन कार्यात सहभागी होणे याबाबत सेवादल सतत आघाडीवर राहिलेले दिसते. याबाबतीत सेवादलाचा इतिहास व वर्तमानसुद्धा उल्लेखनीय आहे हे निर्विवाद. राष्ट्र सेवादलासारख्या संघटनेस आपले प्राधान्य मानणारे पूर्णवेळ सेवक हे त्या संघटनेचा कणाच असतो. सेवादलाकडे फार मोठ्या संख्येने नाही; पण तरीही काही असे पूर्णवेळ सेवक आहेत, ज्यांनी इतर कुठल्याही मोहात न पडता पन्नास-साठ वर्षे सेवादलासाठीच काम केले आहे. त्यांच्या वैयक्तिक क्षमता कमी-जास्त असतील, कामाची गती कमी-जास्त असेल, राजकीय-समाजिक परिघामध्ये नव्याने उदयाला येणाऱ्या संकल्पना समजून घेण्याची कुवत कमीजास्त असेल पण सेवादलासारख्या कुठल्याच अर्थाने लाभदायक नसणाऱ्या, चमकदार कार्यक्रमाचे आणि त्या निमित्ताने मिळणाऱ्या व्यासपीठाचेही आकर्षण नसणाऱ्या संघटनेत वर्षानुवर्षे काम करीत राहणे हे विशेषच आहे. सेवादलाला अशा कार्यकर्त्यांचा अभिमान आहे.

७. वरील मुद्द्यांच्या अनुषंगानेच एका कौटुंबिक जिव्हाळ्याच्या पद्धतीने संघटना चालविण्याची एक चांगली पद्धत सेवादलात रूढ झालेली दिसते. त्यामुळे गावोगावी सेवादलाची म्हणवणारी कुटुंबे आणि त्या कुटुंबांचा स्वतःचा असा एक गट तयार झालेला दिसतो. अर्थात त्याचा अनेकवेळा तोटाही झालेला दिसतो. असा गट चटकन नवीन कार्यकर्त्यांना स्वतःमध्ये सामावून घेत नाही. नवीन कार्यकर्ते अशा बंदिस्त कौटुंबिक गटांना बिचकतात. एक प्रकारचे केंद्रीकरण होताना दिसते.

८. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सार्वजनिक जीवनात झालेल्या अनेक चळवळींमध्ये सेवादल कार्यकर्ते आघाडीवर राहिलेले दिसतात. हैद्राबाद मुक्तिसंग्राम, गोवा मुक्ती आंदोलन, संयुक्त महाराष्ट्र लढा अशा अनेक आंदोलनांचे नेतृत्व व संयोजन सेवादल संस्कारित कार्यकर्त्यांनी केले आहे. अगदी अलीकडील नर्मदा बचाओ आंदोलनातही सेवादल संस्कारित कार्यकर्ते कार्यरत आहेत. अर्थात या सर्व चळवळींमध्ये सेवादल संघटना म्हणून सहभागी झाले नाही, तसे व्हावे की नाही हा मतभेदाचा विषय होऊ शकतो; पण ज्या कार्यकर्त्यांनी या चळवळी चालवल्या त्यांना प्रेरणा सेवादलातून मिळाल्या हे नाकारता येणार नाही.

९. राष्ट्र सेवादल संस्कारित कार्यकर्त्यांनी पुढे जाऊन विविध क्षेत्रांत संघटना चळवळी उभारल्या. तसेच शिक्षण, आरोग्य व ग्रामीण विकास या क्षेत्रांत अनेक स्वयंसेवी संस्था या सेवादल कार्यकर्त्यांनी उभारल्या आहेत पण त्यांचे आणि सेवादलाचे जैविक संबंध राहून दोघांचे काम एकमेकांना पूरक व्हावे असा प्रकार झाला नाही; कारण जे घडले ते एका नियोजनबद्ध व्यूहरचनेतून घडलेले नाही, तर व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचारातून ज्याने-त्याने आपला रस्ता शोधावा, तसे घडले. त्यामुळे शिक्षण, आरोग्य आणि ग्रामीण विकास क्षेत्रात सेवादल संस्कारित कार्यकर्त्यांचे अनेक भव्य उपक्रम असूनही त्याचा सेवादलाला काहीच परतावा मिळाला नाही, मिळत नाही. असे सर्व प्रयोग अत्यंत स्वयंभू व आत्मकेंद्रित पद्धतीने वाटचाल करताना दिसतात, अशा प्रयोगांना एकत्र आणून विचार-विनिमयातून काही विधायक सूचना सेवादलाने कराव्यात असे तर काही दिसत नाही परंतु अशा संस्थांमधून अनेक दोष, उणिवा, कमतरता ढळढळीतपणे समोर दिसत असताना त्यात दुरुस्ती सुचविण्याच्या बाबतीतही ज्येष्ठ सेवादल कार्यकर्ते हतबल दिसतात.

वरील सर्व मुद्दे म्हणजे लोकशाही समाजवादी व्यवस्था साकारण्याच्या दृष्टीने सेवादल संघटनेचे अधिकाचे मुद्दे आहेत असे मी मानतो. आता याबाबतीत सेवादलाचा समाजजीवनात प्रभाव पडावा इतक्या संख्येने किंवा इतक्या मोठ्या प्रमाणावर हे उपक्रम सेवादलाने केले. का? तर महाराष्ट्रापुरता विचार केल्यास १९७० ते १९७५ पर्यंत राष्ट्र सेवादल विचारांचा, उपक्रमांचा जनमानसावर प्रभाव होता हे नक्की. नंतर मात्र हा प्रभाव हळूहळू कमी होत गेल्याचे जाणवते. महाराष्ट्राबाहेर बिहार, उत्तरप्रदेश, मध्यप्रदेश या राज्यांत सेवादलाचे काम निष्ठेने, चिकाटीने काही कार्यकर्ते करतात; पण जनमानसावर प्रभाव पडेल इतके प्रभावी काम ते कधीच नव्हते हे मान्य करावे लागेल.

### समाजवादी चळवळीच्या मर्यादा

सर्व वाटचालीत मला स्वतःला काही मर्यादा, उणिवा दिसतात त्या अशा - अर्थात या उणिवा फक्त सेवादलाच्या नसून एकूणच लोकशाही समाजवादी चळवळीच्या आहेत.

**१. धर्मविषयक आकलनात उणीव -**

समाजामध्ये धर्म ही एक प्रभावी सामाजिक संस्था आहे. ती नाकारण्याने धर्माचे उच्चाटन होण्याऐवजी आपणच सश्रद्ध समाजापासून दूर फेकले जातो हे वास्तव ओळखून त्यासंदर्भात विचारपूर्वक काही व्यूहरचना करण्यात एकूणच लोकशाही समाजवादी चळवळ कमी पडली, तसे सेवादलसुद्धा कमी पडले. धर्मांधता आणि सश्रद्धता यांत फरक करणारी मांडणी, किंवा

धार्मिक कडवेपणातून, परधर्मीयांबद्दल विद्वेष पसरवणाऱ्या गटांना विरोध करतानाच चालत आलेल्या सांस्कृतिक परंपरा, उत्सव यांच्यात सहभागी होऊन सर्वसामान्य उदारमतवादी समूहांना त्यांच्या शुद्ध वैयक्तिक उपासना स्वातंत्र्यास मोकळेपणाने मान्यता देत हळूहळू प्रागतिक विचारांसाठी कसे संघटित करायचे, असे काही तंत्र आपल्याला विकसित करता आले नाही. वारकरी संप्रदायातील तुकाराम, ज्ञानेश्वरांसारखी प्रतीके जी बहुजन समाजात आजही मान्यताप्राप्त आहेत, त्यांच्या क्रांतिकारक मांडणीशी नाळ जोडत आपला विचार पुढे नेण्याच्या बाबतीतही फार प्रगती आपण केली नाही. सगळा भर टोकाच्या बुद्धिवादी मांडणीवर राहिला त्यामुळे आपली मुळे बहुजन समाजात रुजली नाहीत. अर्थात मांडणी बुद्धिवादी क्रांतिकारक राहिली पण हे क्रांतिकारकत्व बहुतांश कार्यकर्त्यांच्या आचरणात मात्र उतरले नाही. इथे विरोधाभास दिसतो. कारण कडव्या कार्यकर्त्यांचा समूह संख्येने थोडा असला तरी प्रभावी ठरू शकतो. समाजवादी चळवळीत तेही झालेले दिसत नाही.

**२. त्यागाच्या तत्त्वज्ञानाचा अतिरेक -**

समाजासमोरील समस्यांच्या निराकारणाच्या आव्हानासाठी समाजातील काहींना त्यागाचे आवाहन हे मध्यमवर्गीयांना चटकन् भिडू शकते. पण ज्या शोषित दबलेल्या समूहांच्या नावे संघटना चालवायची त्यांना हे आवाहन कसे पेलवणार? अशा समूहांतील कार्यकर्त्यांना काही प्रमाणावर व्यवहार पहावा लागणार, त्यांना व्यावहारिक आवाहनच मानवणार. त्यामुळे त्या तिकडे झोपडपट्टी आहे, तिथे सर्व समस्याच समस्या आहेत, त्या सोडविण्यासाठी सैनिकहो चला ; कामाला लागा; करा थोडासा त्याग, असे आवाहन नैसर्गिकपणे संघटनेस एक प्रकारचे मध्यमवर्गीयपण देते आणि हे जसे लोकशाही समाजवादी परिवारातील जवळजवळ सर्व संघटनांच्या बाबतीत घडले तसे ते सेवादलाच्या बाबतही घडले.

खरे म्हणजे - "मित्रहो, आपण सर्व अडचणीत आहोत. माझ्यासहित आपणा सर्वांच्याच समस्या आहेत. एकेकट्याच्या प्रयत्नाने त्या समस्या सुटणार नाहीत. (किंबहुना एकेकट्याच्या समस्या सुटणे हे योग्यही नाही) म्हणून आपण सर्वजण कामाला लागू. संघटित होऊ आणि संघटित प्रयत्नांनी जेव्हा सर्वांचा प्रश्न सुटेल तेव्हा आपोआपच माझाही प्रश्न सुटेल, तुझाही सुटेल असा जर संघटनेच्या आवाहनाचा गाभा असेल तर संघटना आपोआपच बहुजनवादी बनेल, तिचे मध्यमवर्गीयपण हळूहळू कमी होईल. या माझ्या मांडणीमध्ये कार्यकर्त्यांच्या वैयक्तिक अडचणींचा संघटनेत विचार व्हावा असा इतका साधा सरळ मुद्दा नाही. माझे म्हणणे असे आहे की अनेक वेळा चटकन् प्रासंगिक यश मिळवून देणाऱ्या उपक्रमांनासुद्धा असा काही विरोध केला जातो की जणू काही सरळसाधा सोपा आणि बहुजन म्हणजे सर्वसामान्य जनतेला पचेल असा एखादा यशस्वी उपक्रम करणेसुद्धा पाप आहे असे वाटावे. प्रत्येक वेळी काहीतरी मूलभूत गंभीर असा नियोजनबद्ध उपक्रम करणे अशी जर पद्धत असेल तर संघटनेत कुठल्या प्रकारच्या कार्यकर्त्यांचे प्राबल्य असेल हे कुणी सांगायला नको.

म्हणजे आपण जेव्हा नवीन कार्यकर्त्यांना समाज परिवर्तन ही दीर्घकाळ चालणारी प्रक्रिया आहे आणि आपल्या हयातीत आपल्याला उत्तरे मिळणार नाहीत आणि तरीही निष्ठेने आपण काम करायचे आहे असे आवाहन करतो तेव्हा मला आपण कर्मविपाकाच्या सिद्धांताच्याच जवळपासचे काहीतरी बोलत आहोत असे वाटते. यापुढील काळात ही उणीव भरून काढता येईल का?

**३. समाजवादी चळवळीतील समन्वयाचा अभाव -**

राष्ट्र सेवादल ही समाजवादी चळवळीतील विविध संघटनांचा जोडणारा दुवा असेल असा महत्त्वाकांक्षी विचार सेवादलाच्या नेतृत्वाने फारसा केला नाही. मध्यंतरी असा एक प्रयत्न झाला. पुढे तो बारगळला. पण सेवादलाने असे वडीलपण स्वतःकडे घेतले तरी अन्य संस्था-संघटना तसे ते देतील का? हीसुद्धा एक शंका आहे. कारण बहुतेकजण सेवादलाकडे कार्यक्रमांना स्वयंसेवक पुरवणारे हुकमी केंद्र अशा दृष्टीने पाहतात.

पण सेवादलाकडून अशा पुढाकाराची अपेक्षा आजकाल डाव्या राजकीय पक्षांसहित अनेकजण व्यक्त करू लागले आहेत. ही प्रक्रिया गंभीरपणे सुरू करायला हवी. ती पुढेपुढे जाईल तेव्हा आपोआपच सेवादलाला तो अधिकार मिळेल.

**४. आक्रमक प्रबोधन -**

अन्य उपक्रमांसोबतच त्या त्या काळात चर्चेत येणाऱ्या विषयांसंदर्भात लोकशाही समाजवादी विचारांच्या अनुषंगाने आक्रमक प्रबोधन मोहीम राबवणे हा सेवादलाने आपला प्राधान्याचा उपक्रम मानायला हवा. (अशा विषयांच्या संदर्भात राष्ट्र सेवादलाचे नाव जोडले गेले नाही.) त्या बाबतीत आजवर सेवादल फार योगदान देऊ शकले नाही. यापुढील काळातआम्ही ते जरूर देऊ.

**५. समाजवादी राजकीय पक्षाचा अभाव -**

आदरणीय एस. एम. जोशी म्हणायचे, 'सेवादल हा अपूर्णांक आहे आणि समाजवादी आंदोलन हा पूर्णांक आहे.'

अण्णांच्या संकल्पनेतील समाजवादी आंदोलन उभे करायचे असेल तर त्यासाठी सेवादल परिवारातील अन्य संघटनांनाही पूरक ठरेल असा एक समाजवादी राजकीय पक्ष






अस्तित्वात असणेही फार गरजेचे आहे. तुम्ही कुणीही सातत्याने फक्त प्रबोधनपर किंवा विधायक उपक्रम राबवून समर्थ होऊ शकणार नाही; ते खरोखरच अपूर्ण काम आहे. सर्वसामान्य जनतेच्या मनातील असंतोषाला वाट करून देण्यासाठी त्यांना त्यांच्या दैनंदिन प्रश्नांसंदर्भात काहीतरी दिलासा मिळवून देण्यासाठी काही हत्यारच तुमच्याजवळ नसेल तर तुमचे प्रबोधनपर उपदेश ऐकायला आमच्याजवळ वेळ नाही हेच उत्तर आपल्याला ऐकावे लागणार आहे.

त्यामुळे सेवादल या अपूर्णांकाचे समाजवादी आंदोलनरूपी पूर्णांकात रूपांतर करण्यासाठी एका समर्थ समाजवादी पक्षाची गरज आहे असे मी मानतो. कारण आपल्याला पटो अथवा न पटो, लोकशाहीत प्रत्येक प्रश्न हा राजकीय असतो आणि संसदीय राजकारण अपरिहार्य असते. त्याच्या गुणदोषांसकट ते स्वीकारावे लागते.

'लोकशाही समाजवाद' या विषयावरील साधनेच्या विशेषांकासाठी त्या विषयाच्या अनुषंगाने 'राष्ट्र सेवादलाचे काय योगदान अपेक्षित होते व त्यादृष्टीने काय काय साध्य झाले?' या मर्यादेतच लेख लिहिण्याची सूचना मला होती. त्या अनुषंगाने माझी मते मी मांडली आहेत. सध्या मी जरी राष्ट्र सेवादलाचा पदाधिकारी असलो तरी हा लेख सेवादलाच्या निर्णयप्रक्रियेतून आलेला नाही. त्यामुळे ही संघटनेची अधिकृत भूमिका नसून माझी वैयक्तिक मते आहेत. हे लक्षात घेऊन वाचकांनी लेखाची मर्यादा आणि अपूर्णता समजून घ्यावी अशी विनंती आहे.

('साधना' १७ ऑगस्ट २००२ मधून साभार.)

✠ ✠ ✠

## राष्ट्रसेवादल

"राष्ट्रसेवादल स्वायत्त ठेवण्यासाठी काँग्रेसपासून जसे ते अलग ठेवले पाहिजे तसेच काँग्रेस समाजवादी पक्षापासूनही ते अलगच ठेवले पाहिजे, असे माझे ठाम मत होते. काँग्रेस समाजवादी पक्षाबरोबर सेवादलाचे संबंध चांगलेच होते; पण त्या पक्षातही असे म्हणणारे लोक होते की राष्ट्रसेवादल काँग्रेस समाजवादी पक्षाशी जोडले जावे. ...सेवादलासारखी शैक्षणिक संस्था स्वायत्त ठेवून देशभर ती वाढवणे, समाजवादी शीलाचे नागरिक बनविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहे अशी माझी भूमिका होती.... माझी भूमिका बहुमताने मान्य झाल्यावर मीही हळूहळू सेवादलाच्या कार्यातून माझे लक्ष काढून घेऊन, लोकांचा गैरसमज वाढू नये म्हणून ट्रेड-युनियनच्या आणि पक्षाच्या कामात अधिक लक्ष घालू लागलो. एकच प्रमुख आमरण ठेवू नये, त्याचा 'पर्सनॅलिटी कल्ट' तयार होतो; ही भावना बऱ्याच लोकांच्या मनामध्ये होती. म्हणून दलप्रमुख बदलीत राहायचे हे धोरण स्वीकारले.

"आता मला लोक विचारतात की मी सातत्याने सेवादलाचेच काम का करीत राहिलो नाही; पण मलाही व्यक्तिगत आकांक्षा होत्याच. समाजवादी पक्षामध्ये आपण मोठे व्हावे, ट्रेड युनियनच्या क्षेत्रात मोठे व्हावे, या आकांक्षा होत्याच. आज असाही एक विचार मनात येतो की, दलप्रमुखत्वाची मुदत संपल्यानंतर दुसरा जो कोणी प्रमुख असेल त्याला मदत करीत मी सेवादलाच्या क्षेत्रात अधिक लक्ष पुरवले असते तर काय झाले असते? तसे झाले असते तर सेवादलाची शक्ती वाढली असते असे मला वाटते.

"राष्ट्रसेवादलातून समाजप्रबोधनाची काही नवी शक्ती निर्माण झाली का? हा प्रश्न जेव्हा माझ्या डोळ्यासमोर येतो तेव्हा 'हो, झाली आहे' असेच उत्तर मिळते. सेवादलाच्या कामाची एक वेगळीच गुणवत्ता आहे. दोन सामाजिक घटकातील अंतर भरुन काढण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न सेवादलाने केला. सेवादलाने निर्माण केलेले नेतृत्व, राजकारणात असूनसुद्धा, थोडी मूल्ये धरुन असलेले असेच आहे. ते कोठल्याही पक्षामध्ये असो. माझ्यापुरते सांगावयाचे तर मी विरोधी पक्षात असूनसुद्धा काँग्रेसच्या लोकांमध्ये माझ्याबद्दल जी थोडीफार आस्था आहे, जो काही मान आहे त्याचे मुख्य कारण मी राष्ट्रसेवादलात काम केले आहे हे असण्याची शक्यता आहे. महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर चळवळीत बरीच कटुता निर्माण झाली होती, परंतु सेवादलाच्या कार्यामुळे ती कटुता आता कमी झाली आहे. म्हणजे जातिभेद गेला आहे असे नाही परंतु वातावरण पुष्कळच बदलले आहे.

"अखेरीस व्यक्तिगत आंतरिक परिवर्तन झाले तरच सामाजिक परिवर्तनाला वेग येणार. या व्यक्तिगत मानसिक परिवर्तनाच्या दृष्टीने सेवादलाचे काम ट्रेड युनियन मधील कामापेक्षा अधिक महत्त्वाचे आहे. नवसमाजनिर्मिती ही मुळात समतेवर आधारित असावयास हवी. समतेवर आधारलेला आणि प्रत्येक व्यक्तिमत्वास विकासाची संधी देणारा समाज आपल्याला निर्माण करावयाचा आहे, हे सेवादलाचे ध्येय. त्या ध्येयाच्या आड येणाऱ्या समस्या दोन. हिन्दु-मुस्लिम प्रश्नाबाबत सेवादलाची भूमिका पहिल्यापासून स्पष्ट आहे. येथे धर्मातीत राष्ट्रवादच आला पाहिजे आणि तदंगभूत समान नागरी कायदा हवा ही भूमिका सेवादलाने सोडलेली नाही. हिन्दुसमाजात असलेली विषमता आंतरजातीय विवाह जसजसे अधिक होत जातील तसतशी नष्ट होत जाईल. आता असे विवाह व्हावयाचे तर ज्यांना आपण आजवर जातीपातीवरुन कमी लेखले ते समान दर्जाचे झाल्यावाचून आंतरजातीय विवाह व्हावेत कसे? सेवादलात ब्राह्मणेतर समाजातील बहुसंख्य मंडळी होती. त्यातून शंभराहून जास्त युवकांनी आंतरजातीय विवाह केले आहेत. शंभर ही संख्या ही काही फार मोठी संख्या नव्हे. पण ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर अशी जी खाई होती ती दूर करण्याच्या कामी या विवाहांमुळे मदत झाली आहे ही गोष्ट सामाजिक परिवर्तनाचा इतिहास लिहू इच्छिणाऱ्याला दृष्टीआड करता येणार नाही.

(मी एस०एम० पृ० १६०-१६३)

संकलन - देवदत्त दाभोलकर






# स्त्री-प्रश्नाकडे पाहण्याची समाजवादी दृष्टी
## डॉ. राम मनोहर लोहिया
### विद्युत भागवत

समाजवादी विचारवंत राम मनोहर लोहिया यांनी स्त्री-प्रश्नाचे सिद्धांकन परिपूर्ण स्वरूपात केले नाही, हे खरे असले तरी देशाच्या पतनाची पाळेमुळे स्त्रियांच्या बंदिस्तीमध्ये आणि जाति-प्रथेमध्ये आहेत, हे स्पष्टपणाने १९५० च्या दशकात मांडणे महत्त्वाचे होते. म्हणूनच भारतातील परिवर्तनवादी चळवळीला लोहियांनी केलेली स्त्रीप्रश्नांची मांडणी आजच्या संदर्भात समजावून घेणे, तपासणे, आणि पुढे नेणे भागच आहे. दारिद्र्य, वंशवाद, जातिविषमता, भाषिक प्रश्न, इतिहासाचे तत्त्वज्ञान, भांडवलशाही, समता, स्त्रीप्रश्न अशा अनेक विषयांवर लेखन करणाऱ्या लोहियांवर जसा जर्मनीतील समाजवादी चळवळीचा प्रभाव होता, तसाच महात्मा गांधींच्या विचारांचाही होता. युरोपीय संदर्भात चिकित्सा करण्याचा आग्रह धरणारे लोहिया इतिहासाची गती चक्राकार असते असे मानतात. पण म्हणून दैववादी होऊन थिजलेपणाने जगणे कसे चूक आहे हेही दाखवतात. पृथ्वीवरील साऱ्या मानवजातीच्या भरकटणाऱ्या, वर्तमानातच बेभान होऊन जगणाऱ्या किंवा उपक्रमशून्य होऊन थिजणाऱ्या वृत्तींना सावध कृतिशीलता देण्यासाठी इतिहासाची मीमांसा त्यांनी केली. त्यांनी इतिहासाला पुराणकथा, दंतकथा, वीरगाथा, कला, साहित्य या साऱ्यांच्या समन्वयाची जोड देण्याची आवश्यकता भक्कमपणे मांडली. स्त्रीवादी चळवळीला आणि अभ्यासकांना तर आद्य विचारवंत म्हणून लोहिया खऱ्या अर्थाने महत्त्वाचे वाटले पाहिजेत, कारण उक्ती-कृतीमध्ये सुसंगती ठेवण्याचा प्रयत्न करणारा आणि त्यासाठी किंमत देणारा असा हा विचारवंत होता.

लोहियांनी सातत्याने, समाजवादाला मूलभूत सिद्धांताचा पाया हवा; कम्युनिझम किंवा भांडवलशाही यांच्या तुलनेत समाजवादाने स्वतःचे तत्त्वज्ञान उभे करायला हवे ही जाणीव आपल्या लेखनातून अभिव्यक्त केली. सैद्धांतिक पाया असलेला समाज उभा करण्यासाठी जातिव्यवस्था व स्त्रीदास्य या दोहोंविरुद्ध लढणे, वर्गव्यवस्थाविरोधाइतकेच महत्त्वाचे आहे, असेही लोहिया मानतात, हे लक्षात घ्यायला हवे. आजच्या संदर्भात भारतीय समाजात राजकारण, समाजकारण या दोन्ही क्षेत्रांत स्त्रिया मोठ्या प्रमाणात उत्सुकतेने सहभागी होऊ पाहत आहेत. तसेच मध्यमवर्गीय शिक्षित घरांमध्ये मोठ्या प्रमाणात बदल घडत आहेत आणि त्यातून वरवर का होईना परंतु समानतेवर आधारित असे स्त्री-पुरुष नाते घडविले जाते आहे; तरीही स्त्रीप्रश्नांची गुंतागुंत मात्र वाढतच जाते आहे; इतकेच नाही, तर गेल्या दशकात दलितांच्या राखीव जागांच्या विरोधात किंवा अल्पसंख्यांकांच्या विरोधातील हिंसाचारात, लुटालुटीत सहभागी होण्यास न कचरणाऱ्या स्त्रियांमध्येही हिंदू मध्यमवर्गीय सवर्ण स्त्रियांचे प्रमाण मोठे दिसते आहे. आणखी एक महत्त्वाचे निरीक्षण येथे नोंदवावेसे वाटते ते असे की, लोहियांनी आपल्या लेखनात वापरलेला, रूढ केलेला 'योनीशूचिता' हा शब्द स्त्रीमुक्तीविषयक विचारांसंदर्भात वापरला गेला, तर आजही भल्याभल्यांकडून 'म्हणजे तुम्हाला वेश्याव्यवसाय हवा आहे का?' किंवा 'पावित्र्यशुद्धता न मानणे म्हणजे स्वातंत्र्य वा मुक्ती आहे का?' असे प्रश्न संतापल्या सुरात ऐकावे लागतात.

आपल्याकडे विचारवंत म्हणून लोहियांची दखल जशी घेतली जाणे आवश्यक होते तशी घेतली गेली नाही. मूलभूत विचार मांडणारे लोहिया पाठ्यपुस्तके, प्रमुख प्रवाही इतिहास-शास्त्र, राज्यशास्त्र, माध्यमे यांमधून अदृश्यच राहिले. म्हणून नव्या पिढीला सवंग, सैल जीवनपद्धतीला तोंड देताना नेमकी काय भूमिका घ्यावी, यासंदर्भात दिशाहीनता अनुभवास येते. लोहियांनी केलेला स्त्रीप्रश्नांसंबंधी विचार 'नर-नारी' या पुस्तकातील मांडणीमध्ये काही प्रमाणात सलगपणे हाताशी लागतो. लोहियांच्या काळाच्या मानाने त्यांचे विचार आजही धाडसी आणि पुढे नेणारे वाटतात. लोहियांनी मांडलेले प्रमुख मुद्दे पुढीलप्रमाणे -

१. भारतातील उदासीनता केवळ गरिबी आणि रोगराईमुळेच निर्माण झाली नसून स्त्रिया आणि शूद्र यांना म्हणजेच एकूण लोकसंख्येच्या तीन चतुर्थांश भागाला दडपून राजकारणापासून दूर ठेवून झालेली आहे.

२. भारतीय समाजातील विवाहसंस्था, कुटुंबसंस्था अधिकाधिक क्रूर झाली आहे. कारण पाप-पुण्याच्या कल्पना, वैध-अवैधतेच्या कल्पना बदलत्या काळानुसार न बदलता त्यांमध्ये चिखल साठला आहे, भारतीय पुरुष आणि विशेषतः स्त्रिया अत्यंत सक्रीयपणे जातिभेद व लिंगभेद या दोन तुरुंगामध्ये

अनुक्रमणिका

सहभागी होतात.

३. पश्चिम आशियात, युरोपातही स्त्रियांचे दुय्यम स्थान शिल्लक आहे. परंतु भारतीय स्त्रीची अवस्था मात्र विशिष्ट प्रकारे बिकट आहे. स्त्रीच्या संदर्भत शुचिता, पावित्र्य या आदर्शाचा संबंध शरीरापर्यंतच मर्यादित केला गेला असल्याने भारतातील सर्व स्त्रियांच्या दृष्टीने विवाह हा लांच्छित, अपमानित करणारा तुरुंग ठरतो. (लोहियांनी येथे समाजरचनेच्या गंभीर चर्चेत स्त्रियांना शारीरपातळीवर कसे माणूसपण नाकारले जाते हे अत्यंत उचितपणे मांडले आहे)

४. भारतीय स्त्री नावाची व्यापक संज्ञा नसल्याने भिन्न वर्गातून स्त्रिया भिन्न पद्धतीने जगण्याचे मार्ग शोधत असतात. उदा. रामाला पापी मानणाऱ्या शेतमजूर स्त्रिया; तर तेच आपले आराध्य दैवत म्हणणाऱ्या मध्यमवर्गीय सनातनी स्त्रिया आणि अत्यंत उच्च स्तरावरील या जगाचाही पत्ता नसलेल्या स्त्रिया, अशी अनेक रूपे दिसतात.

५. तरीही सर्व भारतीय स्त्रियांमध्ये समानता असेल तर सर्व वर्गातील सर्व श्रेणीतील स्त्रियांना दुर्गा, भगवती, काली असे काहीही म्हटले गेले तरी मुळातच दुबळा पदार्थ म्हणून त्या वाढवल्या गेलेल्या असतात. समाजाची प्रस्थापित चौकट व्यापक दृष्टीने मोडण्याचा प्रयत्न स्त्रिया करूच शकत नाहीत.

६. भारतातील स्त्रिया प्रस्थापित समाजव्यवस्था मोडण्यासाठी सामूहिक प्रहार करण्याऐवजी व्यक्तिगत स्वरूपात, चोरूनमारून शोकडो प्रकारांनी रूढीविरुद्ध वागतात.

७. भारतीय संस्कृतीत गार्गी, मैत्रेयी यांसारख्या द्रष्ट्या आणि द्रौपदीसारख्या तेजस्वी स्त्रिया असूनही दुतोंडीपणा माजला आहे. त्यामुळे स्त्री दर महिन्याला नवीन होते हे सूत्र संस्कृतीत असतानाही स्त्री-जीवनाचे सारे नियम, उपनियम यांचा केंद्रबिंदू योनिशुचिता हाच मानला गेला असल्याने अवघे स्त्रीजीवन मलीन आणि निर्जीव बनले आहे.

८. बहुसंख्या स्त्रियांना पिडणाऱ्या प्रश्नांकडे मध्यम-वर्गीय, शहरी, तोंडपाटिलकी करणाऱ्या वरिष्ठ जातींचे दुर्लक्षच होते. स्त्रियांना शिक्षण द्या, हुंडा नको, आणि घटस्फोट नको एवढ्यापुरतीच या मंडळींची मजल जाते. स्त्री स्वातंत्र्य ही संकल्पनाही त्यांच्या मनात येत नाही. म्हणूनच समान स्थान, समान संधी या गोष्टी दूरच्या ठरतात.

९. कष्टकरी स्त्रीची खालावणारी प्रकृती, पाणवठ्यावर पाणी भरण्यासाठी करावे लागणारे कष्ट यांकडे मध्यवर्गीय स्त्री-पुरुष इतके दुर्लक्ष करतात की त्यांची माणुसकीची व्याख्या त्यांच्या छोट्या वर्तुळापुरतीच सीमित राहते. अशा कष्टकरी, चोवीस कोटी बायकांना स्त्रियाच न मानण्याचे धोरण वरिष्ठ वर्ग अवलंबतो. बायकांना होणारी कुटुंबांतर्गत मारहाण, शिक्षणाच्या प्रसाराने आपोआप दूर होईल असे या वर्गाला वाटते.

१०. भारतीय कुटुंबामध्ये आणि समाजामध्ये स्त्रीला दुबळी आणि परावलंबी बनवून क्रौर्य आणि अन्याय यांचे चक्र फिरत राहते अशा परिस्थितीत पुरुषही भेकड होऊन आपल्यापेक्षा लहान, दुबळ्या माणसाला (समाजात) दडपत, त्रास देत जगतो.

११. भारतीय स्त्रीला पतिव्रताधर्माचे प्रतीक मानताना पुरुषांना मात्र तसे नियम लावले जात नाहीत. मर्यादा, नीतीनियम यांचे पालन करणारा, संयमित राहून राजकारण करणारा राम सीतेचा त्याग करतो याचेही कारण आपल्या समाजातील चुकीच्या पतिव्रताधर्माच्या संकल्पनेत आहे. त्याचा निषेध केला पाहिजे.

१२. भारतीय स्त्रीचे प्रतिनिधित्व द्रौपदीसारख्या असामान्य स्त्रीला दिले पाहिजे. तिचे कृष्णाशी असणारे नाते, द्रौपदी ज्ञानी, हजरजबाबी, समज आणि धैर्य असलेली स्त्री होती. दरबार, मैदान, जंगल सर्व क्षेत्रे समान क्षमतेने हाताळणारी होती. द्रौपदीसारख्या संपन्न आणि गुंतागुंतीचे आयुष्य जगलेल्या स्त्रीला भारतीय नारीचे प्रतीक करणे आवश्यक आहे. त्यातून भारतीय स्त्री-पुरुषांचे मानसिक परिवर्तन शक्य होईल.

१३. भारतातील पुरुषसत्ता स्त्रियांना परतंत्र ठेवून तेजस्वी बनवू पाहते. आपली पत्नी ज्ञानी असावी पण ती आपल्या ताब्यातही असावो अशा परस्परविरोधी भावना मनात बाळगणे चुकीचे आहे. थोडक्यात भारतातील सर्व वर्चस्ववादी गटांतील स्त्री-पुरुषांना खऱ्या अर्थाने आधुनिक होऊन बुद्धीची पुनर्रचना करावी लागणार आहे. तसे केले तरच गार्गी, मैत्रेयी, लीलावती किंवा महादेवी अक्का यांच्या जगण्याचे खरे अर्थ समाजाच्या तळापर्यंत पोचविता येतील.

१४. स्त्रियांच्या सौंदर्याविषयीचे पारंपरिक विचार गोऱ्या रंगाशी जोडून भारतातील बहुसंख्य कृष्णवर्णीय स्त्रियांना सौंदर्य या संकल्पनेतून बाद केले गेले आहे. द्रौपदीसारख्या स्त्रियांचे सौंदर्य त्यांच्या अफाट विद्वत्तेत सामावलेले असते तर आसाम-मधल्या स्त्रियांचे स्वातंत्र्य, श्रम आणि सौंदर्य यांची फारकत करता येत नाही. सर्व स्त्रियांची दडपणूक करण्यामध्ये काळ्या-गोऱ्यांमधील भेदभाव हा एक मोठा भाग असतो.

'नर-नारी' पुस्तकातील लेखनाच्या ओघात लोहियांनी गुजरातेतील स्त्रियांच्या दडपणुकीचे उदाहरण घेताना असे लिहिले आहे की, 'गुजरातमधील दोन-तीन स्त्रिया रांजी

आत्मदहन करतात. त्या समाजालाच आग लावायला का पुढे येत नाहीत? सर्वस्वी जखडबंद आहे म्हणूनच ना?' (लोहिया - १९८४, पृष्ठ १९.) गुजरातेतील स्त्रिया हे केवळ उदाहरण म्हणून लोहियांनी म्हटले असले तरी त्यातील आशय महत्त्वाचा आहे. आत्ताच्या दंगलीमध्ये गुजरातमध्ये स्त्रियांचा सहभाग इतक्या मोठ्या प्रमाणात होता आणि दुसऱ्या जमातीतील स्त्रियांवर बलात्कार वा खून लादण्यात किंवा लुटालूट करण्यात आपल्या पुरुषांना साहाय्य करण्यात, बाईपणाच्या नात्याचे सर्व धागे तोडून हिंसक होणाऱ्या स्त्रीजीवनाचा अर्थ कसा लावायचा हा मोठा गंभीर पेच आपणा सर्वांपुढेच उभा आहे. फक्त विवाहाच्या चौकटीतच बांधलेले स्त्रीचे अवघे जगणे मातृत्वाखेरीज - तेही 'वैध' - कोणतेही अस्तित्व नाकारलेली सवर्ण हिंदू स्त्री आत्मदहनाबरोबरच आता अन्य जमातीतील स्त्रीच्या दहनापर्यंत येऊन पोचली आहे हे भारतीय समाजाचे कटू गुंतागुंतीचे वास्तव लक्षात घेता भारतातील हा कट्टरपणा केवळ उदारमतवादी व्यक्तिवादाने थांबणार नाही, हे लोहियांचे म्हणणे महत्त्वाचे वाटते. हिंदू समाजातील कट्टरता नष्ट करून वर्ण, जाती, स्त्री-जीवन, संपत्ती आणि सहिष्णुता या संदर्भातील प्रश्न मोठ्या प्रमाणात हिंदू समाजातूनच उभे केले गेले पाहिजेत. आपल्या विविधतेतील एकतेचा सिद्धांत सक्रीयतेने साकार करण्यासाठीही भारतातील स्त्री-पुरुषांना स्त्रीदास्याचे विश्लेषण गाभ्याचा विचार म्हणून स्वीकारावे लागेल.

('साधना' १७ ऑगस्ट २००२ मधून साभार.)

卐 卐 卐

## स्त्री-पुरुष समानता

एसेमशी झालेल्या अनसूया लिमये यांच्या चर्चेचे काही प्रसंग (एस्० एम्० पृ० ५४-५६)

अनुताई : "अण्णा, पुरुषांचं बरं असतं. त्यांना बाहेरच्या कामाबरोबर घर, मुलं यांची कर्तव्यं मागे नसतात."

अण्णा : (समजुतीच्या स्वरात) "ते खरे आहे. पण माझं म्हणणं तू लक्षात घे. माझं तर असं म्हणणं आहे की आम्हा पुरुषांपेक्षा तुम्ही स्त्रिया भाग्यवान आहात. कारण तुम्हाला निसर्गानेच मातृत्वाची जबाबदारी दिली आहे. समाजवादाची शिकवण लोकांना देणं तुम्हा स्त्रियांनाच जास्त चांगलं जमेल. असं बघ, आईला चार मुलं असली तर, एकाला जास्त, दुसऱ्याला कमी असं आई कधी करते का? उलट, एखादं मूल दुबळं असेल, अपंग असेल, तर खरी आई त्याच्यासाठी जास्त वेळ देईल. त्याला जास्त सकस अन्न देईल, त्याची जास्त काळजी घेईल. समाजवाद तरी दुसरं काय शिकवतो? आई कुटुंबासाठी हे करीत असते. समाजवाद समाजाच्या क्षेत्रात हीच शिकवण देतो. गरीब, मागास, हरिजन, स्त्रिया यांना इतर समाजाबरोबर आणा यावरच आपण भर देतो ना? मग हे सारं तुम्ही स्त्रिया जास्त करू शकाल की आम्ही पुरुष? मी तर म्हणतो तुम्ही माता म्हणून आमच्यापेक्षा जास्त चांगल्या कार्यकर्त्या व्हाल!"

दुसरा प्रसंग क्रांतीसंबंधातला. देशाची फाळणी होणार हे ठरलं आणि नोआखालीचं हत्याकांड सुरु झालं. महात्मा गांधी स्वातंत्र्य सोहळ्यासाठी न थांबता, नोआखालीत जाऊन बसले.

अण्णांनी मुद्दाम मला बोलावून माझी आणि महात्माजींच्या मदतीला धावलेल्या माझ्या पतींची - श्री० शिरुभाऊंची - चौकशी केली. पण त्याहीपेक्षा महत्त्वाचं म्हणजे इंदू केळकर आणि सिंधू देशपांडे - ज्या माझ्याबरोबर १९४२ च्या चळवळीत जेलमध्ये होत्या - त्यापण नोआखालीत कामाला जाऊ इच्छित होत्या. बऱ्याच पुरुष कार्यकर्त्यांचं म्हणणं, आणि अर्थातच स्त्रियांचं देखील, असं होतं की तिकडे स्त्रियांवर अत्याचार घडत आहेत, त्यांच्या अब्रूवर घाला पडत आहे, तिथे स्त्रियांनी जाणं धोक्याचं! शेवटी मी त्या दोघींना घेऊन अण्णांकडे गेले. अण्णांनी सगळं ऐकून घेतलं, आणि म्हणाले, "विरोध करणाऱ्या मंडळींना तुम्ही सांगा, एखाद्या ध्येयासाठी प्राणावर उदार झालेल्या स्त्री-कार्यकर्त्यांच्या अब्रूची काळजी तुम्ही कशाला करता? त्या पाहून घेतील. मी तुम्हाला मुळीच अडवणार नाही. मात्र विचारपूर्वक पाऊल टाका." आमच्या विचारांचा तो विजय होता.

नंतर सीमा लढा जोरात चालू असताना, शेकडो सत्याग्रही बेळगावच्या दिशेने वाटचाल करणार होते... पण त्यापूर्वी अण्णांनी मला सांगितले होते, "तू एक स्त्रियांची तुकडी घेऊन गुजराथमध्ये जा. मुंबई, बेळगांव, निपाणी सह संयुक्त महाराष्ट्राची आमची मागणी असली तरी मुंबईत गुजराथी मंडळींवर जे अन्याय होत आहेत ते मुळीच योग्य नाहीत. गुजराथी मंडळींशी आमचा मुळीच विरोध नाही. उलट भाषावार प्रांतरचनेच्या बाबतीत त्यांनी चालवलेल्या महागुजराथ आंदोलनालाही आपण पाठिंबाच देत आहोत. हे व्यक्त करण्यासाठी तिकडेही एक तुकडी गेली पाहिजे व ती स्त्री-सत्याग्रहींची तुकडी असेल, तर मला बरे वाटेल."

"आंतरजातीय विवाहाचा पुरस्कार राष्ट्रसेवादलाने केला. अनुभवाने एक मुद्दा माझ्या लक्षांत येतो तो असा की समाजात स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनं स्थान मिळाले पाहिजे हा संस्कार मनात खोलवर रुजलेला नसेल तर जातीतील विवाहही अपेशी ठरतात; तेथे आंतरजातीय विवाहांचे काय विचारावे? स्त्रीपुरुष समानतेचा विचार राष्ट्रसेवादलात केवळ अभ्यासवर्गातूनच येतो असे नाही तर तो कलापथक, सेवा-ऊर्फ-श्रमदान पथक यामधूनही येतो. मैदानी व शारीरिक शिक्षण मुलींना पूर्णपणे स्वतंत्ररित्या द्यावे व मुलींच्या शाखानायक मुलीच असाव्यात, एवढा कटाक्ष व्यावहारिक गरज म्हणून सेवादलाने बाळगला. मात्र कलापथकाची, श्रमदानाची कामे, सेवाकार्य, अभ्यासवर्ग ही उपांगे स्त्री-पुरुष सेवादल सैनिकांनी एकत्र करण्याची कामे होत हे कृतीने दाखवून दिले." (मी एस०एम० पृ० १६३)

संकलन - देवदत्त दाभोलकर






# समाजवादी शील : व्यक्तीचे आणि राजकीय पक्षांचे

ग० प्र० प्रधान

आजवर तत्त्वज्ञांनी वेगवेगळ्या विचारधारा जगासमोर मांडल्या आहेत. काहीजण त्यांना पटलेल्या विचारधारेचा केवळ बौद्धिक पातळीवर स्वीकार करतात. ते त्यांची वैयक्तिक भूमिका तत्त्वसंगत रीतीने मांडतात. काहीजण त्यांच्या विचारधारेचे प्रखर समर्थन करतात. काही थोड्या व्यक्तीच अशा असतात की, त्यांना पटलेली विचारधारा त्यांचे सारे जीवनच व्यापून टाकते. हेही खरे की सर्व विचारधारांच्यात माणसांना भारून टाकण्याचे, त्यांना वेडे बनविण्याचे सामर्थ्य नसते. काही थोड्या निवडक, राजकीय वा सामाजिक विचारधारा मात्र काही व्यक्तींच्या, जनसमुहांच्या मनाचा पूर्णपणे कब्जा घेतात. समाजवाद ही अशीच ध्येयवादी व्यक्तींच्या मनाचा कब्जा घेणारी प्रखर विचारधारा आहे आणि ही ज्यांनी मनोमन स्वीकारली आणि ती आचरणात आणण्याचा प्रयत्न केला त्यांचे जीवन यशस्वी होवो वा न होवो, पण त्यांना आयुष्यभर समाजवादी विचारधारेमुळेच आंतरिक सामर्थ्य लाभते. इतरांना त्यांचे आयुष्य व्यर्थ गेले असे वाटले तरी समाजवादी शील असलेली ही माणसे मात्र स्वतःशी म्हणत असतात,

'व्यर्थी अधिकची अर्थ वसे
तो ज्यास दिसे त्या म्हणती पिसे'

असे समाजवादी शील घडणे मात्र सोपे काम नाही. या शीलाचा नेमका आशय काय आहे हे स्पष्ट करताना कार्ल मार्क्सनं म्हटलं आहे, "समाजाचे वर्णन आजवर अनेकांनी केले आहे. आपले ध्येय तो समाज आमूलाग्र बदलणे हे आहे." (मेनी हॅव डिस्क्राइब्ड दि सोसायटी, अवर टास्क इज टू चेंज इट.) मार्क्सने श्रमिकांचे शोषण शतकानुशतके कसे केले गेले आहे हे पाहिले. या शोषणातून, अन्यायातून निर्माण झालेल्या आर्थिक विषमतेमुळे त्याचे मन पेटून उठले आणि त्याने त्यासंबंधीचे विचार मांडण्यास सुरुवात केली. ही आर्थिक विषमता नष्ट झाली पाहिजे असे तर त्याला वाटलेच, त्याचबरोबर श्रमिकांना त्यांच्यावर होत असलेल्या अन्यायाचे स्वरूप समजले की, संघटित होऊन ते या अन्यायाविरुद्ध संघर्ष करतील असाही त्याला विश्वास वाटला, कम्युनिस्ट मॅनिफेस्टोमध्ये त्याने, मानवी इतिहास हा शोषक आणि शोषित या दोन वर्गांमधील संघर्षाची कहाणी आहे हा सिद्धांत ज़ळजळित शब्दांमध्ये मांडून 'जगातील श्रमिकांनो एक व्हा' (वर्कर्स ऑफ दि वर्ल्ड युनाइट) अशी संघर्षासाठी एकजूट करण्याची हाक त्याने श्रमिकांना दिली. बंडाचे निशाण फडकविणारा कार्ल मार्क्स हा स्वतः श्रमजीवी नव्हता, आणि तो हे ही जाणत होता की, त्याने मांडलेल्या समाजवादी विचारधारेने भारावलेले बुद्धिजीवी वर्गातील ध्येयवादी तरुणच श्रमिकांना संघटित करून विषमता आणि अन्यायाविरुद्ध करावयाच्या संघर्षाचे नेतृत्व करतील. हे करताना त्यांना उच्चभ्रू मनोवृत्तीचा त्याग करून श्रमिकांशी एकरूप व्हावे लागेल. अशी एकरूपता झालेल्या कार्यकर्त्यांचे शील प्रत्यक्ष संघर्षातूनच घडेल असे मार्क्स मानीत होता. शील घडणे ही केवळ बौद्धिक प्रक्रीया नाही. संस्कार घेणे, हा शील घडण्याचा प्रारंभ असतो. या संस्कारातून विचारांना आणि भावनांना अनुकूल वळण लागते. त्यानंतर प्रत्यक्ष कामाच्या अनुभवातून विचारांना स्पष्टता लाभते आणि भावनांना उत्कटता येते. त्याच्या पुढची अवस्था म्हणजे संघर्षात सहभागी होणे. हा अनुभवही एक कसोटी असते. काही जण या कसोटीस उतरत नाहीत आणि ते विचारांच्या बाबत तडजोडी करू लागतात. काही वेळा ज्या राजकीय पक्षामध्ये वा संघटनेत आपण काम करतो तेथील नेतृत्व अपुरे पडते. काही वेळा आपल्या विचारांचे विरोधक बलिष्ट व आक्रमक असल्यामुळे परिस्थिती आपल्या कार्यास प्रतिकूल बनते. या व अशा सर्व अडचणींना तोंड देत, पराभवाने नामोहरम न होता, वास्तवाचे भान ठेवून जे कार्यकर्ते आयुष्यभर समर्पण भावनेने त्यांच्या कुवतीप्रमाणे काम करतात त्यांचेच शील घडले आहे असे मी मानतो.

स्वातंत्र्यपूर्व काळात मानवेंद्रनाथ रॉय यांनी १९२० च्या सुमारास मुंबईला ट्रेडयुनियन चळवळ उभारीत असलेले भाई डांगे, मिरजकर, निंबकर, घाटे, देशपांडे, जोगळेकर यांना मार्क्सवादी साहित्य पाठविले. या सर्वांनी आणि त्यांच्या भारतातील कलकत्ता, मद्रास येथील सहकाऱ्यांनी कम्युनिस्ट चळवळीची पायाभरणी केली. मात्र ब्रिटिश राजवटीत

अनुक्रमणिका








कम्युनिस्ट पक्षावर बंदी असल्यामुळे हे सर्व जण ट्रेड युनियन चळवळ उघड रीतीने चालविताना कम्युनिस्ट पक्षाचे कार्य भूमिगत रीतीने करीत असत. त्यांच्यापैकी बहुतेकांना मीरत कटाच्या खटल्यात गोवण्यात येऊन त्यांना कारावासाची शिक्षा देण्यात अली. १९३० च्या गांधींच्या नेतृत्वाखालच्या आंदोलनात हे कार्यकर्ते सामील झाले नाहीत. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या आदेशाप्रमाणे काम करीत असल्यामुळे भारतातील कम्युनिस्टांनी १९३० च्या स्वातंत्र्य चळवळीस विरोध केला.

स्वातंत्र्य चळवळीत १९३० साली सहभागी झालेल्या अनेक तरुण स्वातंत्र्यसैनिकांनी कारावासात मार्क्सच्या ग्रंथाचे वाचन केले आणि समाजवादी विचारधारेने ते प्रभावित झाले. मात्र ही विचारधारा भारतातील परस्थितीस अनुरूप अशा रीतीने आचरणात आणावयाची असेल तर कम्युनिस्टांनी केलेली चूक टाळून स्वातंत्र्य संग्रामाच्या मुख्य प्रवाहातच आपण राहिले पाहिजे आणि त्या संग्रामाचा आशय केवळ राजकीय स्वातंत्र्य असा मर्यादित न ठेवता भारताचे स्वातंत्र्य येथील श्रमिकांना न्याय देणारे असावे ही विचारधारा प्रखर केली पाहिजे, असे या तरुणांनी ठरविले. आचार्य नरेन्द्र देव आणि जयप्रकाश नारायण हे या नव्या पिढीतील प्रखर स्वातंत्र्यवादी आणि समाजवादी विचारांच्या तरुणांचे मार्दर्शक होते. भारतातील वेगवेगळ्या तुरुंगामध्ये जे विचारमंथन झाले त्यामधून सुटल्यानंतर, स्वातंत्र्य चळवळीत राहून समाजवादी विचारांच्या आधारे काम करण्याचा निर्णय या कार्यकर्त्यांनी घेतला. या निर्णयानुसार १९३४ साली काँग्रेस समाजवादी पक्षाची स्थापना करण्यात आली. १९४२ च्या स्वातंत्र्य संग्रामाच्या अखेरच्या पर्वामध्ये या पक्षाच्या नेत्यांनीच भूमीगत चळवळीचे नेतृत्व करून स्वातंत्र्य लढ्यास प्रखरता आणली. दुर्दैवाने भारतीय कम्युनिस्ट पक्ष, आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीच्या - म्हणजंच स्टालिनच्या आदेशाप्रमाणे - स्वातंत्र्य लढ्यात सामील झाला नाही. दुसरे महायुद्ध हे लोकयुद्ध आहे अशी भूमिका घेऊन रशियाचे त्यावेळेपुरते दोस्त झालेल्या ब्रिटीश साम्राज्यवाद्यांना भारतातील कम्युमिस्टांनी पाठिंबा दिला.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर समाजवादी नेत्यांपैकी जयप्रकाश नारायण आणि डॉ. राम मनोहर लोहिया यांनी सामाजिक न्याय व समतेसाठी भारतात मार्क्सवादी विचार पुरेसा नाही, आपण म. गांधींच्या विचारांचे पुरोगामित्व समजून घेतले पाहिजे आणि समाजवादी चळवळ पुढे चालविताना म. गांधींनी सांगितलेली व आचरलेली साधन-शुचिता पाळली पाहिजे अशी भूमिका मांडली. डॉ. लोहिया यांनी समाजवादी पक्षाच्या पंचमढी येथील अधिवेशनात त्यांना अभिप्रेत असलेला समाजवादाचा आशय सुस्पष्टपणे मांडला. भांडवलशाही नियोजन यामध्ये अर्थसत्तेचे केंद्रीकरण केले होते. याला पर्याय म्हणून समाजवादी पक्षाने विकेंद्रीत नियोजनाचा पुरस्कार केला पाहिजे आणि भारतात प्रचंड गुंतवणुक आवश्यक असलेली (कॅपिटल इटेन्सिव्ह) मोठी यंत्रे न वापरता ज्यामधून भारतातील जास्तीतजास्त लोकांना रोजगार देता येईल असे येथील परिस्थितीस अनुरूप असलेले तंत्रज्ञान स्वीकारले पाहिजे, असा विचार मांडला. त्याचप्रमाणे डॉ. लोहिया यांनी पक्षातील कार्यपद्धतीसाठी नवी जातिनीतीही सांगितली. येथे हे स्पष्ट केले पाहिजे की, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भारतात सामाजिक विषमता हीच मुख्यतः आर्थिक विषमतेच्या मुळाशी आहे आणि सामाजिक विषमतेचे निर्मूलन प्रथम करणे आवश्यक आहे हा विचार अत्यंत प्रभावीपणे माडला. दुर्दैवाने अद्यापही येथील कम्युनिस्ट पक्षाने भारतीय परिस्थितीतील हे वास्तव मान्य केलेले नाही. डॉ. लोहिया यांना मात्र सामाजिक व आर्थिक विषमता या दोहोंचेही निर्मूलन झाले पाहिजे असे वाटत होते. डॉ. आंबेडकरांशी त्यांनी पत्रव्यवहारही केला होता. आणि त्या दोघांची बैठक होणार होती. दुर्दैवाने डॉ. आंबेडकर यांचे निधन झाले आमि नंतर डॉ. लोहिया हे जरी सामाजिक विषमतेचे निर्मूलन व्हावे अशी भूमिका मांडीत राहिले तरी भारतीय समाजवादाचे स्वरूप स्पष्टपणे मांडून सामाजिक समता व आर्थिक समजा यांचे लढे कसे चालवावे याचे मार्गदर्शन करण्याइतकी उसंत त्यांना लाभली नाही. पुढे १९६७ साली डॉ. लोहिया यांचे निधन झाले. त्यानंतर काही वर्षांनी जयप्रकाश नारायण यांनी त्यांना अभिप्रेत असलेली संपूर्ण क्रांतीची कल्पना मांडली. त्यांमध्ये सामाजिक विषमता व आर्थिक विषमता या दोहोंचेही निर्मूलन झाले पाहिजे असा विचार त्यांनी मांडला. परंतु याबाबत त्यांनी अधिक तपशीलवार व रेखीवपणे लिहायला पाहिजे होते.

मी हे सर्व सविस्तर लिहिले कारण त्याशिवाय आजच्या संदर्भात समाजवादी शीलाबद्दलचे विचार मला मांडता येणार नाहीत. भारतातील परिस्थितीच्या संदर्भात समाज-वादाची मांडणी पुढील तीन सूत्रांच्या आधारे करावी लागेल.

१. समाजवाद आणि लोकशाही यांची फारकत करून चालणार नाही. लोकशाही ही केवळ राज्यपद्धती आहे असे मी मानत नाही. ती जीवनदृष्टी आहे. प्रत्येकाला त्याचे मत






निर्भयपणे मांडण्याचे स्वातंत्र्य असले पाहिजे आणि म्हणून लोकशाहीवादी व्यक्तींनी आणि संस्थांनी त्यांच्याविरुद्ध मत असणाऱ्या व्यक्तींच्याही मताला मान दिला पाहिजे; इतकेच नाही तर या विरोधकांच्या मतस्वातंत्र्यावर आघात झाला तर लोकशाहीवादी व्यक्तींनी त्यांच्या या न्याय्य हक्कांच्या संरक्षणासाठी खंबीरपणे त्यांना पाठिंबा दिला पाहिजे.

२. डॉ. आंबेडकर घटना समितीत भाषण करताना त्यांनी पुढील आशयाचा विचार मांडला होता. 'आपण भारतातील २१ वर्षांवरील प्रत्येक स्त्रीपुरुषास मताचा अधिकार देत आहोत. मतदानाचा हा हक्क राजकीय लोकशाहीतील पायाभूत अधिकार आहे. परंतु आपल्या समाजातील सामाजिक आणि आर्थिक विषमता जर कायम राहिली तर हा राजकीय हक्क प्रत्यक्षात निरर्थक होईल. सामाजिक व आर्थिक विषमतेचे निर्मूलन केले नाही तर लोकशाहीचा सांगाडा उरेल पण प्राण हरपेल.' समाजवादामध्ये आर्थिक समतेस मार्क्सने अग्रक्रम दिला. परंतु आपल्या देशातील लोकशाही समाजवादाला सामाजिक समतेचे अधिष्ठान असलेच पाहिजे. आपल्या समाजातील जातिव्यवस्था - चातुर्वर्ण्य या विषमतेला पायाभूत आहे. लोकशाही समाजवादाच्या मुळावर ही विषमता आघात करते.

३. भारतीय समाजवादात येथील अल्पभूधारक शेतकरी, भूमीहीन शेतमजूर यांनाच क्रांतीचे अग्रदूत मानावे लागेल. मार्क्सने क्रांतीचा अग्रदूत कामगार हा असेल असे लिहिले होते. हे प्रमाण मानून भारतातील कम्युनिस्ट पक्षाच्या आणि समाजवादी पक्षाच्या नेत्यांनी ट्रेड युनियन चळवळीस प्राधान्य दिले. राजकारणाला आणि आर्थिक क्षेत्रातही पुरोगामी वळण देण्यात ट्रेड युनियन चळवळ एका वेळी उपयुक्त ठरली हे मान्य केले पाहिजे. परंतु औद्योगिक क्षेत्रातील संघटित कामगार, बँका आणि इन्शुरन्स क्षेत्रातील कर्मचारी तसेच प्राध्यापक व शिक्षक आदींना हवी असलेली नोकरीतील सुरक्षितता मिळाल्यानंतर आणि त्यांचे पगार, महागाई भत्ते भरपूर वाढल्यानंतर १९८० सालापासून ट्रेडयुनियन चळवळ राजकीय क्षेत्रात निष्क्रीय बनली आहे. इतकेच नव्हे तर भारतातील संघटित कामगार व कर्मचारी शिक्षक आदींमधील सेवकवर्ग फक्त त्यांच्या आर्थिक मागण्यांच्या पलीकडे अन्य असंघटित श्रमिकांच्या आणि गरिबांच्या न्याय्य मागण्यांसाठी लढणे ही आपली जबाबदारीच नाही अशा वृत्तीने वागू लागला आहे. संघटित कामगार वा कर्मचारी हे आता उच्च मध्यमवर्गीय झाले असून त्यांनी शेतकरी व शेतमजूर यांच्याशी बांधिलकी ठेवण्याचेही नाकारले आहे. भारतातील संघटित कामगार व विविध क्षेत्रातील कर्मचारी यांना आता समाजवादाचे सोयरसुतक उरलेले नाही. भारतात समाजवादी समाजरचना निर्माण करावयाची असेल तर येथील अल्पभूधारक शेतकरी, शेतमजूर आणि सर्व क्षेत्रातील असंघटित श्रमिक यांचीच चळवळ उभारावी लागेल. या वर्गासाठी लढणाऱ्या कार्यकर्त्यांचे शील हेच समाजवादी शील होऊ शकेल. भारतीय समाजवादाचे स्वरूप स्पष्ट करताना नागपूर विद्यापीठाचे कुलगुरू आणि विदर्भातील कापूस पिकविणाऱ्या शेतकऱ्यांची समस्या समर्थपणे मांडणारे माझे मित्र कै. मा. ग. बोकरे यांनी शेतकरी हाच भारतीय समाजवादाच्या केंद्रस्थानी आहे व असला पाहिजे हा विचार अत्यंत प्रभावीपणे मांडला आहे.

समाजवादी शीलाचा विचार करताना आपल्याला मार्क्सच्या विचारांप्रमाणेच रस्किन आणि टॉलस्टॉय या दोन पाश्चात्त्य विचारवंतांचे विचार समजून घेतले पाहिजेत. शारीरीक श्रमांना, तथाकथित बौद्धिक श्रमांपेक्षा कमी मानणे चूक आहे हे स्पष्टपणे सांगून रस्किन यांनी 'अन टु धिस लास्ट' या त्यांच्या पुस्तकात अन्त्योदयाचा जो विचार मांडला आहे तो प्रत्येक समाजवाद्याने आत्मसात केला पाहिजे. तसेच टॉलस्टॉय यांनीही माणसांच्या गरजा किती कमी असाव्यात हे एका गोष्टीतून जे सांगितले आहे तेही प्रत्येक समाजवाद्याने स्वीकारण्याचा जास्तीतजास्त प्रयत्न केला पाहिजे. या दोन पाश्चात्त्य विचारवंतांप्रमाणे समाजवाद्याने गांधीजींची जीवनदृष्टी नीट समजून घेऊन तिचे आचरण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्याचप्रमाणे म. फुले, महर्षि शिंदे आणि डॉ. आंबेडकर यांनी सांगितलेला सामाजिक समतेचा विचार हा त्याच्या जीवनाचा भाग बनला पाहिजे. या सर्व विचारांच्या संस्कारातून व्यक्तीचे समाजवादी शील घडते. परंतु केवळ कार्यकर्त्या व्यक्तींचे आचरण विशुद्ध होणे पुरेसे नाही. समाजरचना बदलण्यासाठी लागणारे समाजवादी शील असलेल्या राजकीय पक्षाचाही आपण विचार करावयास हवा. समाजाची रचना बदलण्यासाठी केवळ विचार किंवा व्यक्तीचे आचरण पुरेसे नसते हे भूदान आंदोलनात आपण अनुभवले आहे. आचार्य विनोबा हे त्यांच्या वैयक्तिक जीवनात महान होते हे मी सांगण्याची गरज नाही. त्यांच्या विचारांची झेप ही असामान्य होती. परंतु ग्रामदानी गावात लोकांनी कसे वागले पाहिजे याबाबत विचार सांगणे पुरेसे नव्हते. त्यासाठी ग्रामदानी गावाच्या सामाजिक रचनेची पथ्ये कोणती आणि हा प्रयोग यशस्वी करण्यासाठी कार्यकर्त्यांनी कोणते संघटित प्रयत्न कसे

केले पाहिजेत हे प्रत्यक्षात करून दाखविणे जरूर होते. भूदानात मिळालेल्या जमिनींचे वाटप करणे सोपे नव्हते. परंतु आचार्य विनोबा भावे यांनी 'भूदान हा धर्मविचार आहे, तो मी सांगत, जनमानसात पेरीत जाणार, त्या विचारात सामर्थ्य असेल तर तो समजेल' अशी भूमिका घेतली त्यामुळे समाजपरिवर्तन घडले नाही. त्याचप्रमाणे दुसऱ्या टोकाला तारू मुजुमदार यांनी सामाजिक न्याय प्रस्थापित होण्यासाठी कार्यकर्त्यांनी शस्त्र हाती घेऊन लढताना स्वतःचे प्राण अर्पण करण्याचे धैर्य दाखवले पाहिजे असे सांगितले. या विचारानुसार कार्य करणारे नक्षलवादी आज भारतात आहेत, परंतु शासनाकडे असलेल्या शस्त्रसामर्थ्यास तोंड देताना क्रांतिकारकांचा दहशतवाद यशस्वी होत नाही हे तेलंगणामध्ये व बंगालमध्ये दिसून आले आहे. म्हणून समाजपरिवर्तन मूठभर क्रांतिकारकांपुरते मर्यादित न राहता त्यांना जनआंदोलनाचे स्वरूप आले पाहिजे आणि यासाठी राजकीय पक्षाचेच प्रभावी साधन निर्माण करावे लागेल. अशा राजकीय पक्षाची शिस्तबद्ध मांडणी करण्यासाठी नेत्यांनी जी पथ्ये पाळावी लागतात ती पथ्ये जयप्रकाश नारायण, डॉ. लोहिया आदी समाजवादी नेत्यांनी पाळली नाहीत. त्यामुळे त्यांच्या विचारांची दिशा योग्य असूनही समाजवादी पक्षाला ते समाजवादी क्रांतीचे साधन बनविण्यात अयशस्वी ठरले. आणि वैयक्तिक जीवनात समाजवादी शील असलेल्या देशातील अनेक कार्यकर्यांच्या जीवनाची वाताहत झाली. बंगाल आणि केरळ मधील मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षांनी अनेक वर्षे संघर्ष करून आणि लोकशाही मार्गाने मिळवलेल्या राजकीय सत्तेचा उपयोग समाजिक न्यायाच्या व समतेच्या प्रस्थापनेसाठी शक्य तितक्या प्रभावीपणे करून तो पक्ष समाजवादी क्रांतीचे साधन बनू शकेल अशी त्या पक्षाची बांधणी केली आहे. वैचारिक पातळीवर मात्र माझे त्यांच्याशी मतभेद आहेत. मार्क्सने १९ व्या शतकात मांडलेले तत्त्वज्ञान हे अपूर्ण आहे. भारतातील समाजिक विषमतेचे निर्मूलन होणे हे आर्थिक विषमतेच्या निर्मूलनाइतकेच आवश्यक आहे. हा विचार त्या पक्षाने स्वीकारला पाहिजे. त्याचप्रमाणे नवी समाजरचना निर्माण करताना सर्व श्रमिकांनी त्यांच्या हक्कासाठी लढताना समाजजीवन समृद्ध करण्यासाठी श्रम केले पाहिजेत. हा विचारही त्या पक्षात असला पाहिजे. बंगालमध्ये व केरळमध्ये अशा श्रमिक-संस्कृतीच्या (वर्क-कल्चरच्या) निर्मितीसाठी मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाने पुरेसे कार्य केलेले नाही असे मला वाटते.

आणखीही काही गोष्टींचा उल्लेख करणे मला आवश्यक वाटते. २१ वे शतक हे ज्ञानाचे शतक आहे म्हणून समाजवादी शील असलेल्या कार्यकर्त्याने आधुनिक ज्ञानाचा स्वीकार करणारी समाजरचना निर्माण करावयाची आहे याचे भान ठेवले पाहिजे. त्याचबरोबर आधुनिक तंत्रविज्ञान हे येथील माणसांना यंत्राचे गुलाम न बनविता त्यांच्या हातांना काम देईल आणि निर्मितीचे समाधान त्या कामातून श्रमिकांना मिळेल याची दक्षता घेतली पाहिजे. याशिवाय समाजवादी समाजाच्या जीवनशैलीमध्ये मानवी संबंधातील सौहार्द आणि मानव व निसर्ग याचे जिव्हाळ्याचे नाते यांना जपलेच पाहिजे. हे सर्व करण्यासाठी राजसत्तेचे आणि अर्थसत्तेचे विकेंद्रीकरण करावे लागेल आणि शेतकऱ्यांना आणि स्त्रियांना न्याय द्यावयाचा हा विचार केंद्रस्थानी ठेवूनच नवी समाजरचना उभारावी लागेल.

मी समाजवादी कार्यकर्त्याचे शील कसे असावे यासंबंधी माझ्या ज्या अपेक्षा मांडल्या त्या पूर्ण करणारे अनेक स्त्रीपुरुष कार्यकर्ते माझ्या परिचयाचे आहेत. परंतु ते आपापल्या गटात काम करतात. समाजवादी संस्कृतीची ही बेटे आहेत. व्यापक जनआंदोलनात ती जोडली गेली पाहिजेत. हे करण्यासाठी समाजवादी शील असलेला राजकीय पक्ष निर्माण करावयास हवा. हे न केल्यास आज समतेसाठी संघर्ष करणाऱ्या आणि विधायक काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचे गट समाजवादी समाजरचना निर्माण करू शकणार नाहीत. काही वर्षांनंतरही समाजवादी समाजरचना अस्तित्वात न आल्यास समाजवादी शीलाचे काही कार्यकर्ते नक्षलवादी होतील, काहीजण मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षात सामील होतील किंवा निदान त्या पक्षाचे समर्थक बनतील. आणि अन्य कार्यकर्त्यांचे कामाचे फलित जनकल्याणाचे कार्य (वेलफेअर वर्क) इतकेच राहील. असे घडू नये, जनआंदोलनातून समाजवादी शील असलेला देशव्यापी राजकीय पक्ष निर्माण व्हावा आणि त्या पक्षातील समाजवादी शीलाच्या कार्यकर्त्यांना भारतीय समाजाचे आमूलाग्र परिवर्तन करून सामाजिक न्याय आणि समता यावर अधिष्ठित असलेला भारत निर्माण करण्यात यश यावे अशी सदिच्छा व्यक्त करण्यापेक्षा मी अधिक काय करू शकणार?

卐 卐 卐

**तुम्ही साम्यवादी - समाजवादी असाल तर प्रथम स्वतःपासून सुरुवात करा.**

**- गांधीजी**






## सातही रंग प्रकाशाला म्हणाले...

सातही रंग प्रकाशाला म्हणाले,
'तुझा रंग कोणता ते सांग.'
प्रकाश म्हणाला, 'मी कशाला सांगू ?
तुम्हीच नीट निरखून पहा म्हणजे झाले.'
प्रत्येक रंगाने नीट निरखून पाहिले.
प्रत्येकाला आपल्या संवादी समलहरी
प्रकाशात आढळल्या.
प्रत्येक रंग 'जितम् मया'
या समाधानात निघून गेला.
प्रकाशाची समन्वय - समाधी मात्र
यत्किंचितही भंगली नव्हती.

- देवदत्त दाभोलकर

(पूर्वप्रसिद्धी : नवभारत)

अनुक्रमणिका

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत :
१ एप्रिल १९९७
पासून लागू

- ☐ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ०० रु.
- ☐ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती — १० रु.
- ☐ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन — ६० रु.
- ☐ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल — ५ रु.
- ☐ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** — ६० रु.
- ☐ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी — ४० रु.
- ☐ **तरंगयामिक व पुंजयामिक** । मा. ग. टोळे — १० रु.
- ☐ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी — ८० रु.
- ☐ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट — ४० रु.
- ☐ **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले — २५ रु.
- ☐ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे — १० रु.
- ☐ **इतिहासाचे तत्त्वज्ञान** (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले — ८० रु.
- ☐ **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २) । शरद पाटील — १०० रु.
- ☐ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण — ४० रु.
- ☐ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी — १०५ रु.
- ☐ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे — २५ रु.
- ☐ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य — ३० रु.
- ☐ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे — १६० रु.
- ☐ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी — ४० रु.
- ☐ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर — २० रु.
- ☐ **कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य** । रा. भा. पाटणकर — ८० रु.
- ☐ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि.के. बेडेकर — १५ रु.
- ☐ **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार** — १०० रु.
- ☐ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** — १५० रु.
- ☐ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे — ८० रु.
- ☐ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** — २०० रु.
- ☐ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले — ८० रु.
- ☐ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर — १२० रु.
- ☐ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन** । द.ना. धनागरे — ४० रु.
- ☐ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे — ५५० रु.

---

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

---

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका